ISBN-81-7418-078-8
Yadnya (Marathi)
Sane Guruji

**प्रकाशक**
श्याम दयार्णव कोपर्डेकर
इंद्रायणी साहित्य
२७३, शनिवार पेठ,
पुणे ४११०३०



**प्रकाशन दिनांक**
२६ जानेवारी २०१४

**मुद्रणस्थळ**
मधुसूदन घळसासी
एम. आर. ॲण्ड को.
१५५२, सदाशिव पेठ, पुणे ३०

## यज्ञ

परमेश्वराने सर्व ब्रह्माण्ड निर्मिले. स्वतःच्या संकल्पातून ही चराचर सृष्टी त्याने उत्पन्न केली. त्याला एकटे राहवेना. अनंत वस्तू निर्माण करून त्यांत रमावे, असे त्याच्या मनात आले. त्याने आकाश निर्मिले, काळ निर्मिला, सूर्य, चंद्र, तारे यांना निर्मिले, सप्तसागर, नाना सरोवरे, अनेक सरिता निर्मिल्या, अग्नी निर्मिला, वायू निर्मिला. अठरा लक्ष भार वनस्पती, चौऱ्याऐंशी लक्ष योनी निर्मिल्या. त्याने देव, दानव, मानव यांना निर्मिले.

सृष्टी निर्मिल्यावर परमेश्वर म्हणाला, विशेषतः मानवांना उद्देशून म्हणाला, "मी तुम्हा सर्वांना उत्पन्न केले आहे. आता उत्कृष्ट खेळ करून दाखवा. मला खेळ दाखविण्यापूर्वी आधी तुम्ही तो पुन्हा पुन्हा करून पाहा. आता खेळ चांगला वठेल, असे जेव्हा तुम्हाला वाटेल, तेव्हाच मला हाक मारा. मध्येच मला कोणी हाक मारू नका. काही अडचणी आल्या, काही संकटे आली, तरी मला नका हाक मारू. आधी तुम्ही प्रयत्न करा. सारेच उपाय हरले तर मी येईन, परंतु आधी येणार नाही. उठल्याबसल्या देवाचा धावा नका करू. मी तुम्हाला एक सार्वभौम उपाय सांगून ठेवतो. संकटनिवारणाची एक राजविद्या सांगून ठेवतो. त्या उपायाचा अवलंब कराल, तर सदैव विजयी व्हाल. त्या उपायामुळे आपत्तीचा परिहार होईल, विघ्ने नष्ट होतील. हा उपाय म्हणजे यज्ञ. यज्ञाने सर्व संकटांचा नाश होईल. यज्ञ हा तुमचा परमेश्वर, यज्ञ हा सखा, यज्ञ ही कामधेनू, यज्ञ हा कल्पवृक्ष, यज्ञ म्हणजे चिंतामणी, स्पर्शमणी. या यज्ञाची कास सोडू नका. यज्ञ

म्हणजेच नरांना कसे जगावे, कसे वागावे, हे शिकविणारा नारायण. यज्ञ हा आमचा आधार, यज्ञ म्हणजे परमागती. यज्ञाने– महान यज्ञानेही– जेव्हा कार्यनिष्पत्ती होणार नाही, संकटे दूर होणार नाहीत, त्या वेळेस मला हाक मारा. माझी योगनिद्रा सोडून मी येईन. पांघरलेली मायेची शाल फेकून मी धावत येईन, परंतु यज्ञोपासना परिपूर्ण झालेली असेल तरच येईन. ध्यानात धरा. जा आता सारी. खेळ सुरू करा. प्रयोग सुरू करा. मांडा, मोडा, पडा, चढा, रडा, हसा. ज्या दिवशी खेळ मला दाखविण्याच्या लायकीचा झाला असे वाटेल, त्या दिवशी मला कळवा. तो प्रयोग मी पाहीन. खेळ चांगला करून दाखविला, तर मग दुसरा करायला देईन. जा आता.''

परमेश्वर चिन्मयाच्या पलंगावर पहुडला. मायांबर अंगावर घेऊन पडून राहिला. इकडे विश्वाचे चक्र सुरू झाले. विराट खेळ सुरू झाला. वारे वाहू लागले. सूर्य तळपू लागला. समुद्र नाचू लागला. तारे चमचम करू लागले. मेघ वर्षू लागले. तृणांकुरांनी पृथ्वी नटू लागली. वृक्ष-वनस्पती वाढू लागल्या. फुले फुलली. भुंगे गुंगु करू लागले. फळे डोलू लागली. पाखरे उडू लागली. किलबिल करू लागली. घोडे दौडू लागले. गायी हंबरू लागल्या. सिंह-वाघ गर्जू लागले. मानवही आपापली कामे करू लागले.

खेळ रंगात येऊ लागला. निरनिराळे संघ होऊ लागले. हत्तींचे कळप झाले. लांडग्यांचे थवे जमले. हरणे संघ करून राहू लागली. चिमण्या, कावळे, मोर, पारवे यांनीही आपापल्या संघटना केल्या. मनुष्यप्राणीही संघ करून राहू लागला.

मानवांचा संघ सुव्यवस्थित होऊ लागला. नीतिनियम होऊ लागले. व्यवहाराची अनुभवाने घडी बसवू लागले. प्रयोग करीत चालले. कसे बोलावे, कसे वागावे, काय खावे, केव्हा खावे, काय प्यावे, किती प्यावे, केव्हा निजावे, केव्हा उठावे, कसे बसावे, कसे हसावे, कोणाला मान द्यावा, कोणाचा कान धरावा, वगैरे सारे ठरू लागले. बारीकसारीक गोष्टींचेही नीट निरीक्षण, परीक्षण होऊ लागले. कोणाला कोणते काम

झेपेल, कोणाची काय आवड, ते पाहण्यात येऊ लागले. ती ती कामे त्यांनी त्यांनी करावीत, असे दंडक झाले. विवाहपद्धतीचा विकास झाला. स्त्री-पुरुषांचे संबंध कसे असावेत, त्याचा गंभीर विचार होऊ लागला. वैवाहिक नीती उद्भवत होती. नवीन नवीन कल्पना, नवीन नवीन विचार स्फुरत होते. ते आपले पहिले पूर्वज मोठे प्रतिभावान होते. त्यांचा मेंदू सुपीक होता. हृदय भावनाप्रधान होते. जीवनाला ते आकार देत होते. मनातील विचार व कल्पना श्रेष्ठ धारिष्ट दाखवून ते कृतीत आणीत होते. त्या प्रयत्नात कोणी कोणी स्वतःची जीवने गमावली, परंतु त्यांच्या अनुभवांनी पुढील पिढी श्रीमंत होई, अधिक सुखी होई.

असे विश्वयंत्र चालू लागले. जोरात फिरू लागले. मधूनमधून परमेश्वर मुलांची परीक्षा घेई. आपण सांगितलेल्या गोष्टी मानवांच्या ध्यानात आहेत की नाहीत, ते पाही. एके दिवशी पडल्यापडल्या प्रभूच्या मनात सर्वांची परीक्षा घ्यावी, असे आले. तो आपल्या अनंत मनात विचार करू लागला. शेवटी त्याच्या संकल्पातून एक बाळ जन्माला आले. मोठे विचित्र होते ते बाळ. काळे काळे स्वरूप होते त्याचे. त्याला आपला आकार इच्छेप्रमाणे कमी-अधिक करता येत होता. नाना रूपे त्याला धारण करता येत. ते बाळ क्षणात लहानशा ठिपक्याप्रमाणे होई, तर क्षणात सारे त्रिभुवन व्यापी.

ज्याने चंद्रसूर्य निर्मिले, सुंदर फुले निर्मिली, मोर-पोपट निर्मिले, त्यानेच तो असुर निर्मिला होता. काळा काळा अक्राळविक्राळ असा तो असुर दिसत होता. त्याचे रूप पाहून प्रभूही जरा दचकला.

"तात, तुम्ही मला निर्माण केलेत आणि तुम्हीच का घाबरता?" त्या असुरबाळाने विचारले.

"अरे, माझ्यासमोर जरा सौम्य रूप धर. तुझे जीवनकार्य करताना तुला पाहिजे असेल ते रूप घे." प्रभू म्हणाला.

"कोणते माझे जीवनकार्य?"

"वत्सा, तुझे काम या सर्व प्राणिमात्रांची परीक्षा घेण्याचे. या



जगाला मी जी शिकवण दिली आहे, तिची त्यांना स्मृती आहे की नाही, हे पाहा. लोक यज्ञनिष्ठ आहेत की नाहीत ते पाहा. एकाही व्यक्तीच्या ठिकाणी हे यज्ञतत्त्व उत्कृष्टपणे बिंबले असले तरी पुरे! ती एक व्यक्तीही विश्वाला तारील. जा!''

''तात, मी परीक्षा कशी घेऊ? मी माझे काम कसे करू? कोणती माझी साधने? आधी माझे नाव काय, ते मला सांगा. त्या नावावरून माझ्या कर्माचा मला नीट बोध होईल. नावावरून कर्म सुचते, जीवनाची दिशा समजते. सांगा, मला कोणत्या नावाने संबोधणार?''

''तुझे नाव वृत्र. समजलास ना? त्या नावात सारे आहे. जा आता. आपल्या कार्याला लाग. तुझ्या हृदयात तुझ्या कर्माची प्रेरणा

मी ठेविली आहे. ती अंतःप्रेरणा ओळख. मी आता आणखी काही सांगणार नाही. मी थोडी सूचना देत असतो. तीवरून सारे समजून घ्यावे.''

वृत्राला निरोप देऊन प्रभू पुन्हा मायेचा पीतांबर घेऊन चिन्मयाच्या पलंगावर पहुडला. वृत्र विचार करीत निघून गेला. तो एका डोंगराच्या शिखरावर बसला. तेथून तो सारे पाहत होता, पाहून विचार करीत होता. प्रभूने माझे नाव वृत्र ठेविले आहे. वृत्र म्हणजे आच्छादणारा, पांघरूण घालणारा. मी कोणाला आच्छादू, कोणाला पांघरूण घालू? कोणाला पोटात घेऊ? कोणाचा घोट घेऊ? कोणाला गिळू? काय माझे काम? कोणता माझा स्वधर्म? जगाची परीक्षा घ्यायची, कशी घेऊ? माझा स्वधर्म कसा पार पाडू? जगाची कसोटी कशी घेऊ?

वृत्र विचार करीत करीत वर वर चालला. विश्वाला तो प्रदक्षिणा घालू लागला. सर्व चराचरांचे तो निरीक्षण करू लागला. या चराचरांची मुख्य नाडी कशात आहे, ते शोधू लागला. आजूबाजूच्या सृष्टीचे स्वरूप नीट समजून घेतल्याशिवाय आपले जीवितकार्य आपणास नीट पार पाडता येत नसते, यासाठी वृत्र सारे न्याहाळीत होता.

वृत्राच्या दृष्टीत एक गोष्ट विशेषकरून भरली. प्रत्यही प्रभातवेळी पूर्व दिशेला तो एक सुंदर चमत्कार बघे. ते दृश्य मोठे नयनमनोहर असे. किती पाहिले तरी वृत्राला समाधान होत नसे. त्या पूर्व दिशेला सूर्य नावाचा एक तेजस्वी गोपाल उभा राही. चराचराचा जणू तो मित्र होता. त्या गोपालाजवळ सहस्रावधी गाई होत्या. नाना रंगांच्या गाई. सात रंगांच्या त्या गाई होत्या. त्या गाईंच्या कासेतून प्रकाशाच्या धारा बाहेर पडत. दुधासारख्या धारा. त्या धारांचा पृथ्वीवर वर्षाव होई. तो सूर्य सारखे त्या गाईंचे दोहन करी. आरंभ आस्ते आस्ते होई. परंतु दुपारची वेळ होत आली म्हणजे हे काम रंगात येई. भराभरा धारा सुटत. सूर्य सायंकाळी दमे व थके. गाईंच्या कासाही रिकाम्या होत. मग त्या गाईंना नंदनवनातील कुरणात सूर्य घेऊन जाई. तेथील मधुर व तेजोमय चारा त्या खात, तेथील अमृत पोटभर पीत. पुन्हा प्रभात

होताच सूर्य त्या सहस्रावधी धेनूंचे दोहन करू लागे. चराचराला धारोष्ण दूध मिळे. प्रकाशमय, जीवनदायी अशा दुधाचा तो वर्षाव करी.

त्या गाईंच्या कासेतील धारा नाचत नाचत झरकन् पृथ्वीवर येत. त्या धारा म्हणजे जणू त्या गाईंच्या जिभा होत्या. त्या प्रकाशमय जिभा चराचराचे अंग चाटीत. चराचराला तेज चढे. कळा चढे. झाडे टवटवीत दिसू लागत. फुले फुलत. धान्ये वाढत, फळांना रंग येई. पाखरे नाचू लागत. माणसांना उत्साह मिळे. त्या प्रकाशमय धारा खिडकीतून, झरोक्यातून घरात शिरत, सर्वांना आनंदवीत व हसवीत. त्या धारा म्हणजे जणू आरोग्याचे रसायन, जीवनाचे पुष्टिप्रदान. त्या धारा म्हणजे जणू प्रभूचा हात, प्रभूचा मंगल आशीर्वाद!

अशा प्रकारचे काम तो तेजोमय सूर्य प्रत्यही करीत असे त्याला कधी कंटाळा माहीत नव्हता. त्या स्वकर्मात तो सूर्य रमे. सारे चराचर त्याचे आभार मानीत. सूर्य दिसताच फुले वर माना करून त्याचे स्वागत करीत. आपल्या सुगंधाची आरती त्याला ओवाळीत. तळ्यातून झोपलेली कमळे हळूच डोळे उघडून प्रेमभक्तीने सूर्याकडे बघत. झाडे आपली हिरवी अंगे प्रेमाने नाचवीत. गिरिशिखरे त्या सूर्यनारायणाला आपल्या डोक्यावर घेऊन नाचवू बघत, पाखरे त्याची गाणी गात. घारी, गरुड, चंडोल यांना तर सूर्याला मिठी मारावी असे वाटे. उंच उडत ती जात. चंडोल तर फारच उंच जाई. परंतु प्रणाम करून पुन्हा खाली येई.

मनुष्यप्राणीही सूर्याचे उपकार जाणी. 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च' सूर्य हा चराचराचा आत्मा आहे, अशा अर्थाची स्तुतिपर गीते मानव रचू लागला. कोणी म्हणत, 'हा ईश्वराचा डोळा आहे.' कोणी म्हणत, 'हा ईश्वराचा मुकुट आहे.' कोणी म्हणत, 'ईश्वराच्या भव्य मंदिरातील हा दीप आहे.' कोणी म्हणत, 'ईश्वराच्या कानातील कुंडल आहे.' कोणी म्हणत, 'त्याच्या वक्षःस्थलावर रुळणाऱ्या हारातील हे दिव्य पदक आहे.' अशा प्रकारे प्रतिभावान कवी कल्पनाविलास करीत होते. त्या सूर्याचे वर्णन करून, स्वतःची वाणी पावन करून घेत होते.

सूर्याजवळ धगधगीत प्रकाश दिसे. अल्पही मालिन्य त्याच्याजवळ दिसत नसे. आपल्या बुद्धीतही किल्मिष नसावे, मालिन्य नसावे, असे मननशील मानवाला वाटे. तो सूर्याला म्हणे, "हे सूर्या! तुझ्या तेजोमय प्रकाशधारा पिऊन आमची बुद्धी निर्मळ होवो. आमची बुद्धी स्वतंत्र असो, जागृत असो. मालिन्याचा लवलेशही आमच्या बुद्धीजवळ नसो." अशी प्रार्थना करून कृतज्ञतेने मानवप्राणी सूर्याला अर्घ्य देत. त्याला सुंदर फुले देत. कोणी त्याचा जप करीत, कोणी त्याचे सतत स्तवन करीत.

वृत्र या सर्व गोष्टी पाहत होता. चराचराचे जीवन मुख्यत्वेकरून हा सूर्य व याच्या या तेजःप्रसवा गाई यांच्यावर अवलंबून आहे, ही गोष्ट प्रखर प्रज्ञेच्या वृत्राच्या ध्यानात आली. चराचराच्या जीवनाचा सूर्य हा प्राण आहे, आधार आहे. या सूर्याला त्याच्या गाईंसह आपण गिळून टाकिले तर? असा एक विचार वृत्राच्या मनात आला. सूर्य व त्याच्या गाई नसतील तर सारे विश्वयंत्र बंद पडेल. सर्वत्र अंधार पसरेल. उष्णता नाहीशी होईल. वारे वाहणार नाहीत, मेघ बनणार नाहीत, पाऊस पडणार नाही, वृक्षवनस्पती वाढणार नाहीत, मानव जगणार नाहीत. सर्वत्र प्रेतकळा ओढवेल. या विश्वाचे मग कोण रक्षण करील? कोणता देव वा मानव उभा राहील? प्रभू म्हणाला की, यज्ञधर्म जिवंत असेल तरच त्याचे रक्षण होईल. पाहू या. हीच परीक्षा होईल, गंमत होईल.

वृत्र हसला. भेसूर हसणे, मरणरूप हसणे. ते हसणे म्हणजे चराचराचे मरण होते. गिळू का गाईंसह हा सूर्य? त्याने स्वतःला प्रश्न विचारला. या सूर्याला गाईंसह गिळण्याची आहे का आपली शक्ती, या गोष्टींचा तो विचार करू लागला. पुन्हा तो हसला व म्हणाला, 'वेडाच आहे मी. माझ्या स्वरूपाचाच मला विसर पडला. मी वाटेल तेवढा मोठा होऊ शकतो. या ब्रह्माण्डाचा मी एक घास करू शकेन. वाढवू का माझे रूप? होऊ का विराट वेषधारी? परंतु माझा नाश तर नाही ना कोणी करणार? कोण करणार माझा नाश? महान यज्ञाशिवाय

कोणतेही शस्त्र माझ्यावर चालणार नाही. यज्ञधर्म तर मेल्यासारखाच झाला आहे. हे स्वर्गात राहणारे देव तर नाचरंगात दंग झाले आहेत. अमृताचा पेला व अप्सरांच्या ओठांचा पेला हे दोन पेले त्यांना सदैव लागतात. यज्ञाचे त्यांना भानही नाही. परंतु मानवात यज्ञधर्म अद्याप रूढ आहे. मानवांनी यज्ञधर्म परमोच्च मानला आहे. यज्ञोपासना ते वाढवीत आहेत, परंतु जाऊन पाहिले पाहिजे. या बाह्य यज्ञोपासनेच्या आत डोकावून पाहिले पाहिजे.'

वृत्राने लघुरूप धारण केले व तो भूतलावर हिंडूफिरू लागला. त्याने नाना देश पाहिले. द्वीपद्वीपांतरे पाहिली, परंतु निर्मळ व सोज्वळ यज्ञोपासना त्याला कोठेही दिसली नाही. हिंडता हिंडता तो खाली भारतभूमीत आला. हिमालयाची सूर्याला भेटू पाहणारी ती स्वच्छ शिखरे पाहून तो आनंदला. हिमालयाच्या पोटातून वाहणाऱ्या सिंधू, गंगा, ब्रह्मपुत्रा वगैरे पवित्र नद्या त्याने पाहिल्या. त्याने खालचा विंध्याद्रीचा हिरवागार कमरपट्टा पाहिला. पूर्वेस व पश्चिमेस उचंबळणारा सहस्रावधी लाटांचा सागर त्याने पाहिला. भारताचे भौगोलिक सौंदर्य पाहून वृत्र वेडा झाला. निरभ्र आकाश, प्रसन्न नद्या, उत्तुंग पर्वत, पाताळाला भेटू पाहणाऱ्या खोल दऱ्या, नाना रंगांची व गंधांची फुले, नाना स्वादांची मधुर फळे, नाना प्रकारचे धीरगंभीर वृक्ष, नाचणाऱ्या वेली, सुंदर मोहक रंगांचे पक्षी व त्यांचे कर्णमधुर आलाप– सारे वातावरण हृदयहारी होते. वृत्राने भारताला प्रणाम केला.

परंतु वृत्राला आंतरिक सौंदर्य बघावयाचे होते. या सुजला, सुफला, सस्यश्यामला, मलयजशीतल भरतभूमीच्या लेकरांचे अंतःकरण त्याला पाहावयाचे होते. त्याला ब्रह्मर्षी, राजर्षी दिसू लागले. त्याला जपी-तपी दिसू लागले. परंतु वृत्र आणखी आत जाऊ लागला. त्याला पुष्कळशी नकली नाणी दिसून आली. बाहेर संयम, परंतु हृदयात वासनांचा नाच. बाहेर दिसायला साळसूद, पोटात कामक्रोधांचे गराळे. कोणाचे जप राज्यासाठी, कोणाचे यज्ञ पुत्रासाठी, कोणाची तपश्चर्या आयुष्य वाढावे म्हणून, कोणाची तपश्चर्या त्रिभुवनाचे भस्म करता यावे

म्हणून. त्या जपतपाच्या मुळाशी नाना प्रकारच्या वासना होत्या.

आणि काही काही ठिकाणी तर त्याने विचित्र प्रकार पाहिले. वर्षानुवर्षे चाललेले यज्ञ त्याच्या दृष्टीस पडले. त्या यज्ञातून सहस्रावधी पशूंचे हसत हसत हवन केले जाई. मांस खावयास मिळावे म्हणून यज्ञ! जिभेचे चोचले पुरविण्यासाठी यज्ञ! धर्माच्या नावाने अधर्म चालला होता. सारा जणू स्वैराचार चालला होता. मांस खावे, सोम प्यावा, खाणेपिणे यापलीकडे काही आहे, याची स्मृतीच नाहीशी झाली. पशूंना खाऊन मानव पशू होऊ लागला.

परंतु यज्ञाच्या या विकृत स्वरूपाविरुद्ध बंड उभारणारे लोकही वृत्राला दिसले. मांसाशनासाठी वृक्व्याघ्रांप्रमाणे ओठ चाटणारे व मिटक्या मारणारे लोक एकीकडे होते, परंतु दुसरीकडे–

"आत्मा यजमानः श्रद्धा पत्नी, मन्युः पशुः तपो अग्नि ।"

अशा प्रकारचा दिव्य यज्ञधर्म समाजाला देऊ पाहणारे महर्षीही उभे होते.

परंतु एकंदरीत पृथ्वीची स्थिती भयाण होती. खरा त्याग, खरा धर्म कोठेच जवळजवळ नव्हता. भरतखंडातही तो फारच थोडा आढळला. वृत्र तपोवनातून गेला. तेथे त्याला पुष्कळच काथ्याकूट आढळला. शब्दांचा कीस काढणारे शब्दवेल्हाळ त्याला आढळले. एकीकडे मांस मटकावणारे, तर दुसरीकडे शब्दच्छल करणारे. पृथ्वीत राम उरला नव्हता. सृष्टीची, चराचराची नाडी वृत्राने पाहिली. माझ्या परीक्षेत हे विश्व टिकणार नाही, असे त्याला वाटले. रोगी मरणार, असे त्याला वाटले.

परंतु ईश्वराने नेमलेले कार्य कठोर असले, तरी वृत्राला करणे भाग होते. सूर्याला धेनूसहवर्तमान गिळून टाकण्याचे त्याने निश्चित केले. सूर्याला सहस्रावधी गाईंसह एकदम गिळण्याची त्याची शक्ती होती, परंतु खेळत खेळत, हळूहळू सर्वांना गिळावे, असे त्याने योजिले.

एके दिवशी प्रभातकाळी भगवान सूर्यनारायण आपल्या गाईंचे थवे घेऊन पूर्वेस उभा राहिला. सौम्य, सुंदर प्रभा सर्वत्र फाकली होती. लाल, पांढऱ्या, निळ्या, पिवळ्या, नाना रंगी गाईंचे दूध सूर्य काढू लागला. पृथ्वीवर प्रकाशधारांचा वर्षाव होऊ लागला. इतक्यात तो

वृत्र लहानसे काळे रूप धरून तेथे अकस्मात येऊन उभा राहिला. काही गाईंचे त्याच्याकडे लक्ष गेले. त्या अशान्त झाल्या. गाईंत हालचाल सुरू झाली.

त्यांनी कान टवकारले. शिंगे सावरली. त्यांचे डोळे अस्थिर झाले. काही गाई बुजल्या व त्या धावू लागल्या. काही गाई शिंगे उगारून वृत्राच्या अंगावर धावल्या. परंतु वृत्राने त्यांची शिंगे धरून त्यांना दूर फेकले. काहीतरी अशुभ आहे, असे गाईंच्या मनात आले. त्या थरथरू लागल्या. पुन्हा काही गाई धीर करून शिंगे उगारून धावत आल्या. वृत्राने एकदम 'आ' पसरला. प्रचंड जबडा. जणू अंधारमय अनन्त दरीच! त्या गाईंना त्याने गिळले. पोटात गेल्या त्या धीट गाई. त्या शिंगांनी वृत्राचे पोट फाडू लागल्या. परंतु ते पोट जणू पोलादी होते. गाईंची शिंगे मोडून गेली, परंतु वृत्राचे ते पोट फाटेना, शेवटी त्याच्या पोटात त्या चुळबूळ करीत राहिल्या.

प्रत्यही असे होऊ लागले. वृत्र समोर दिसताच सूर्य अधिक तापू लागे, परंतु सूर्याची ती आटापीट पाहून वृत्र हसे. हसत हसत तो पुढे जाई व सूर्य पळू लागे. वृत्र काही गाईंना गिळी. गाईंची संख्या कमी होऊ लागली. एके दिवशी नंदनवनातील कुरणाचा अधिकारी सूर्याला म्हणाला–

"धेनूनां संख्या क्षीणा दृश्यते । कुत्र गतास्ते धेनवः । न सम्यक् परिपालनं करोषि इति दृश्यते ।"

सूर्य म्हणाला,–

"भद्र, महान् करालो रिपुः संजातः । स प्रतिदिनं आगच्छति धेनूश्च भक्षयति । किमहं करोमि । अक्षमोऽस्मि तस्य निवारणार्थम् । भवान् एव देवराजाय महेन्द्राय निवेदयतु इमं वृत्तांतम् ।"

शेवटी इंद्राच्या कानांवर गोष्टी गेल्या, परंतु त्याने लक्ष दिले नाही. अप्सरांच्या नाचात तो दंग होता. शुभांगी रंभा, तिला आलिंगीत होता. इंद्राने लक्ष दिले नाही, मग इतर देव तरी का देतील? जसे वरिष्ठांचे वर्तन, तसे कनिष्ठांचे.

हळूहळू पृथ्वीला प्रकाशदुधाचा पुरवठा पुरा पडेना. वृक्ष-वनस्पती निर्जीव व निःसत्त्व दिसू लागल्या. त्यांचे तजेलदार रंग गेले. वाराही नीट वाहीना. लोकांनाही कसेसेच वाटू लागले. त्यांना गार गार वाटे. पोटातील अग्नीही मंदावला. काय झाले, काय झाले, असे लोक एकमेकांस विचारीत. ते सूर्याकडे बघत. सूर्यही त्यांना खिन्न दिसे, निस्तेज दिसे. प्रभातकाळी वा सायंकाळी पूर्वीसारखा रंगसागर उचंबळत नसे. मध्यान्ही तेजस्वी ऊन पडत नसे. काय झाले सूर्याला? काय होणार या विश्वाचे, या चराचराचे?

एके दिवशी सायंकाळी उरल्यासुरल्या गाई घेऊन सूर्य लगबगीने जात होता. आज जरा लवकरच तो परत निघाला होता. वृत्र येण्याच्या आत जाऊ पाहत होता. इतक्यात समोर वृत्र दिसला. सूर्य काळवंडला.

"अरे, मला चुकवून कोठे चाललास? मरण चुकवता येत नाही. माझ्या पोटात जा. तेथे तुझ्या गाई आहेत. माझ्या पोटाच्या दरीत नांदा. रहा उभा!" वृत्र म्हणाला.

"अजून तुझी भूक शमली नाही का? या चार गाईतरी राख. इतके तरी प्रकाशाचे दूध मला जगाला देऊ दे. जग जगेल. कोण आहेस तू? का हा संहार आरंभिला आहेस? मी नसेन, माझ्या या गाई नसतील, तर चराचराच्या नाड्या आखडतील. सारे संपुष्टात येईल. असे करू नकोस! ईश्वराची सुंदर सृष्टी मोडू नकोस. ऐक माझे. मी तुझ्या पाया पडतो. या सृष्टीसाठी पाया पडतो. माझ्या प्राणासाठी नव्हे."

"ईश्वरानेच मला पाठविले आहे. मी विश्व मोडू पाहत आहे. या जगात जर कोणी खरा धर्मात्मा, खरा महात्मा असेल, तर तोच या संकटापासून विश्वाचे रक्षण करू शकेल. असा कोणी आहे का यज्ञस्वरूपी मानव, तेच तर मला पाहावयाचे आहे. मला फारसे बोलायला आवडत नाही. उभा रहा! माझ्या पोटात जाऊन रहा!"

वृत्राने जबडा पसरला. गाई धावू लागल्या. परंतु जबडा वाढत त्यांच्यापुढे आला. गडप! एकदम सूर्य गाईसह गिळला गेला. सूर्य वृत्राच्या पोटात सर्व शक्तीने तळपू लागला. परंतु वृत्राच्या पोटात



अशी काही उक्ती होती की, तो सारा ताप ते पोट सहज सहन करी. आपला पालनकर्ता आपल्याबरोबर आहे, हे पाहून त्या धेनूंना त्या संकटातही धीर आला. सूर्याचे अंग प्रेमाने त्यांनी चाटले. धेनूंच्या डोळ्यांत पाणी आले.

"भगवान, पृथ्वीवरील सारी आमच्या प्रकाशमय पान्ह्याची वाट पाहत असतील. भुकेले असेल विश्व. आमच्या कासा तटतटा फुगल्या आहेत, कोठे सांडू हे दूध. कळा लागल्या स्तनांना." गायी म्हणाल्या.

"धीर धरा. जातील हे दिवस. विश्वाची परीक्षा विश्वंभर घेत आहे. पुन्हा आपण बाहेर पडू व चराचराला प्रकाशमय दूध देऊ. डोळ्यांत पाणी आणू नका." सूर्य म्हणाला.

पृथ्वीवर हळूहळू प्रकाश कमी होत होता. लोकांचे लक्ष त्या गोष्टीकडे गेले होते, परंतु एके दिवशी प्रकाश आलाच नाही. आदल्या दिवशी सूर्य गेला तो गेला. आकाशातील तारे चमकत होते. कोठे गेला सूर्य? तो का मेला, तो का विझला? लोक कितीतरी वेळ अंथरुणातच होते. सूर्य आता येईल, थोड्या वेळाने येईल, अशी आशा करीत होते, परंतु सूर्याचा पत्ता नाही. अंथरुणात कंटाळा आला. पाखरे घरट्यांतून जागी झाली. मुले अंथरुणात जागी झाली, परंतु पाखरे बाहेर पडत ना. मुले बाहेर जात ना. बाहेर रात्र होती. न संपणारी रात्र. अनंत रात्र. हळूच कोणी बाहेर डोकावत, पुन्हा अंथरुणावर येऊन पडत.

अंधारातच लोक हिंडू लागले. जिकडेतिकडे भीतीचे वातावरण पसरले. कोणी वाळलेला पाला पेटविला. कोणी घरी दिवे लावले. काहींच्या घरी तेल नव्हते, तेथे कोठला दिवा? आणि रोज दिवे तरी कोण लावणार? सारे उद्योग थांबले. विणकर विणीना, तेली तेल काढीना. शेतात कोण जाणार? मळ्यात कोण जाणार? सर्वत्र अंधार, अंधार!

दोन-चार दिवस उष्णता पुरली, परंतु पुढे भयंकर स्थिती आली. कोणास बाहेर पडवेना. हातपाय गारठून गेले. वारा नव्हता तरी गारठा होता. असह्य गारठा. वृक्ष-वनस्पती थंडीने करपून गेल्या. गाईगुरे गोठ्यात मृतवत पडली. पाखरे मेल्यासारखी झाली. माद्या पिलांना पंखात घेत होत्या. पाखरे एकमेकांचे वैर विसरून एकमेकांच्या जवळ आली. एकमेकांच्या अंगाची ऊब एकमेकांस देऊ लागली. पशूही तसेच करू लागले. सिंह गारठले, ते हरणांच्या अंगाला चिकटून बसले. हरणांनी आपली अंगे सिंहाच्या आयाळीत घुसविली. लांडग्यांच्या जवळ ससे येऊन राहिले. संकटात प्रेमधर्म आला. सूर्याचा प्रकाश गेला, परंतु प्रेमाचा प्रकाश आला. प्रेमाची ऊब मिळाली.

मानवांची त्रेधा नि तिरपीट. कोणाला उठवेना, फिरवेना, माता मुलांना कुशीत घेऊन पडून राहिल्या. काय खायला देणार, काय प्यायला देणार? सर्वांचे प्राणच जावयाचे, परंतु अद्याप धुगधुगी होती.

आकाशातील ताऱ्यांची थोडीशी उष्णता येत होती आणि अज्ञात ऋषिमुनींची तपश्चर्या– तीही ऊब देत होती.

"संतो भूमी तपसा धारयन्ति"

संत आपल्या तपश्चर्येने विश्वाचे धारण करतात. लहानमोठे असे हे मानव जातीतील तपःसूर्य, जगतीतलावरील या तपोज्योती, त्यांच्यापासून उष्णता मिळत होती. जग जगत होते. कसे तरी जगत होते. ना धड जीवन, ना धड मरण. ना धड जागृती, ना सुषुप्ती. केवळ विकल अशी दशा चराचराला आली. कोणी त्राता राहिला नाही.

"आई!" बाळ क्षीण स्वरात हाक मारी.

"काय बाळ!" असे माता म्हणे व त्याला घट्ट धरू बघे, परंतु हात धरू शकत ना. शक्ती गेली. मुलांना माता जवळ घेऊ बघे; परंतु हातात शक्ती नव्हती. डोळ्यांतही शक्ती नव्हती. अंधारात काही दिसेना आणि दिसले तरी काय उपयोग? डोळे उघडले तर ते मिटण्याची शक्ती नसे. मिटले तर उघडण्याची शक्ती नसे. पाय लांब केले तर आखूड करता येत ना. आखूड केले तर लांब करता येत ना. एका कुशीवर वळले तर दुसऱ्या कुशीवर वळण्याची पंचाईत. सारे चमत्कारिक झाले. कण्हणे, विव्हळणे, त्याचीही शक्ती उरली नाही. पृथ्वी निःशब्द झाली. चलनवलनहीन झाली. परंतु धुगधुगी होती. नाडी मंद उडत होती. हृदयाची क्रिया थोडीतरी चालू होती.

कृपाळू वरुण देव, ते आधी विचार करू लागले. वरुण ही नीतीची देवता. सकल विश्वाचे नियमन करणारी देवता. कर्माकर्म पाहणारी, पापपुण्य पाहणारी देवता. इंद्र ही युद्धदेवता. विश्वावर संकट आले तर इंद्राने निवारावे. वरुणाने पापपुण्याचा विचार करावा; परंतु जेथे सारे कर्मच लोपले तेथे पापपुण्याचा निवाडा तरी कोणता करावयाचा? वरुणदेव महाराज इंद्राला भेटण्यासाठी निघाले.

इंद्राला कशाचे भान नव्हते. तो आपल्या विलासात दंग होता. इतर देवही तेच करत होते. वरुणदेव आले, परंतु त्यांचे स्वागत करायला कोणीही नव्हते. वरुणदेव इंद्राच्या प्रासादाबाहेर येऊन उभे

राहिले. इतक्यात काही अप्सरांना ती गोष्ट कळली. त्या घाबरल्या. त्यांनी इंद्राला वार्ता दिली. इंद्र लाजला. नंतर तो बाहेर आला.

"अभिवादनम्." इंद्र म्हणाला.

"प्रत्यभिवादनम्." वरुणदेव म्हणाले.

"आज का झाले आगमन? मुखश्री अशांत का? काही अशुभ वार्ता आहे की काय? काही संकट आहे का? माझे वज्र आहे. संकटांचा चुरा करीन. सांगा."

"महाराज, जगाचे पापपुण्य पाहणे हे माझे कर्म; परंतु ते कसे पार पाडू? सारे कर्ममात्र थांबले आहे. बाह्यकर्म थांबले तरी मनात वैचारिक वा वैकारिक कर्म– हे सूक्ष्म कर्म सुरूच असते. मनाचे व्यापार चालूच असतात. त्यांच्यावरूनही मी नियमन केले असते; परंतु विचार करण्याचीही शक्ती मानवी मनाला उरली नाही. माणसे जणू मढी बनली. ना हाताचे व्यापार, ना मनाचे. भूतलावर हाहाकार उडाला आहे. कहर उडाला आहे. पृथ्वी का मरणार? एक काडीही राहणार नाही, चिटपाखरूही उरणार नाही, असे दिसते. सारी उष्णताच संपली. सारे थंडगार झाले. सूर्य दिसत नाही. त्याच्या सहस्रावधी प्रकाशधेनू, कोठे गेल्या साऱ्या? कोणीतरी असुर मातला असावा. त्याने हा विश्वसंहार मांडला असावा.

इंद्रदेव, तुम्ही काय करीत होतात? तुम्ही या गोष्टीकडे लक्ष दिले नाही. मागे तुमच्या कानावर कोणीतरी गोष्ट घातली होती, परंतु तुम्ही लक्ष दिले नाही. खानापानात दंग राहिलात. भोग भोगीत राहिलात. परमेश्वर काय म्हणेल? तुम्ही मुख्य कार्यवाह; परंतु तुम्हीच अदक्ष राहिलात. इंद्रदेवा, बोलतो त्याची क्षमा करा. परंतु तुमच्याही कर्माकर्माचा न्याय मला करावा लागेल. तुम्ही स्वकर्तव्यात अळंटळं कराल तर तुमचेही शासन दुःखाने का होईना, परंतु मला करावे लागेल. विश्वात कोठे काय बिघडते, कोणते विघ्न येत आहे, कोणते संकट येत आहे, इकडे अहोरात्र तुमचे डोळे हवेत. तुम्हाला उगीच का देवेंद्र केले? मोठे पद म्हणजे मोठी जबाबदारी; परंतु तुम्ही स्वस्थ व सुस्त राहिलात.

आज गोष्टी या थराला आल्या. चराचर संपुष्टात आले. प्राणज्योती विझू पाहत आहेत. किती दिवस तुमच्याकडे येईन येईन म्हणत होतो; परंतु हिय्या होईना. आज धैर्य केले. म्हटले, सांगावे जाऊन. कर्तव्य हे कठोर असते. देवांनाही कर्तव्यपराङ्मुख होऊन चालणार नाही. देवांनीही 'धृतव्रत' असे राहिले पाहिजे. ऋतसत्याचे परिपालन त्यांनीही केले पाहिजे. इतरांपेक्षा अधिक कसोशीने केले पाहिजे. आता तरी तुम्ही उठा. शत्रू शिरजोर झाला आहे. तो आहे कोठे, त्याचा तपास काढा. त्याचा नाश करा. त्याला शरण यायला लावा.

त्या शत्रूने सूर्य तर गिळला, आता इतर तारामंडळही तो गिळू पाहत आहे. आपल्याविरुद्ध कोणीच कोठे हालचाल करीत नाही, हे पाहून तो उन्मत्त झाला आहे. देवेन्द्रा, उठा. सारी शक्ती पणास लावा. बाकी तुमची शक्ती कितपत पुरी पडेल याची मला मोठी शंका आहे. कर्तव्यपालनाने सामर्थ्य वाढते. कर्तव्यहीनतेने शक्ती क्षीण होते. विलास म्हणजे विनाश. तुम्ही तर सारे विलासलोलुप झालात. तरीही प्रयत्न करून पहा. तुमची शक्ती अपुरी पडली तर मानवांची मदत घ्या. मानव जरी आज मरत पडले असले, तरी कोणी कोणी महात्मे तपश्चर्या करीत असतील. त्यांच्यामुळेच अद्याप जगात धुगधुगी आहे. त्या महात्म्यांची मदत घ्या. सुरांनी, नरांनी सहकार्य करून शत्रूचा निःपात करावा. तुम्ही सारे देव बाहेर पडा. मीही मानवजातीत जाऊन कोणी आहे का महात्मा, ते नीट पाहून येतो. कोणी दिसला तर तुम्हाला येऊन सांगतो. जातो इंद्रदेवा. क्षमा करा कमीअधिक बोलल्याची. शेवटी आपण सारे कर्तव्यदेव आहोत, हे आपण ध्यानात धरू या."

असे बोलून वरुणदेव निघून गेले. ते आपल्या दिव्य सिंहासनावर बसून पृथ्वीचे नीट निरीक्षण करू लागले. कोणता महात्मा तारील, त्याची चिकित्सा करू लागले. नीतीचा प्रकाश, सुरम्य प्रकाश त्यांच्या सिंहासनाभोवती झळकत होता. त्यांच्या सिंहासनाला नाना सद्गुणांचे हिरेमोती झळकत होते. वरुणदेवांची मुद्रा गंभीर दिसत होती. ती क्षणात करुण होई, क्षणात क्रोधी होई.

वरुणदेव गेले. इंद्र तेथेच बसून राहिला. त्याला वाईट वाटले. वरुणदेवांनी केलेली कानउघडणी वर्मी लागली; परंतु त्यात अयोग्य काय होते? वरुणदेव यथार्थ तेच बोलले. इंद्र अजून पक्का कर्तव्यच्युत झाला नव्हता. त्याचे मन त्याला खाऊ लागले. निजलेली कर्तव्यबुद्धी जागी झाली. सदसद्विवेकबुद्धीचा डोळा उघडला. मुकाट्याने तेथे तो बसून राहिला. मुखकळा म्लान झाली. खिन्नता मुद्रेवर पसरली. अधोवदन तो बसला होता. पापाला वर पाहवत नसते. पापाची मान शेवटी खालीच व्हावयाची, आज ना उद्या.

इंद्र आपल्या अंतःपुरात गेला. तेथे रडत बसला. इंद्राणी बाहेर गेली होती. नंदनवनातील फुले गोळा करायला गेली होती. नवीन शेज रचायची होती. नंदनवनातील कल्पवृक्ष रोज नवीन नवीन रंगाची फुले देत. 'कल्पवृक्षांनो, आज नवीन गंधांची, नवीन रंगांची, नवीन आकारांची फुले द्या.' असे म्हणताच ते देत. तेथे काय तोटा?

इंद्राणी आनंदाने नाचत आली. फुलांचे झेले हातात घेऊन आली; परंतु पती ना वर बघे, ना हसे, ना बोले. इंद्राणी पतीच्या जवळ गेली. त्याच्या खांद्यावर आनंदाने हात ठेवून म्हणाली,

"नाथ, का अशी मुद्रा? कोणते दुःख, कोणती वेदना? माझा का काही अपराध आहे? माझ्यावर रागावलात? दुःख व क्रोध जवळजवळच राहतात. प्रेमळ क्रोधाचे दुःखात रूपांतर होते. त्या दिवशी तुम्ही सांगितलेले ते दिव्यांबर मी नेसल्ये नाही म्हणून रागावलात? आज सकाळी तुम्ही आणलेली फुले मी केसात घातली नाहीत म्हणून का हा अबोला? का बाळ जयंताची काही चूक झाली? एकुलता एक मुलगा. केली असेल काही चूक. त्याला का मारलेत बिरलेत म्हणून आता त्याचे वाईट वाटते? जयंता तसा गुणी आहे. एखाद्या वेळेस करतो व्रात्यपणा. त्या दिवशी ऐरावताचे दात धरून ओढीत होता. मी त्याला बोलल्ये; परंतु लगेच पोटाशी धरले. मुलाची जात. तुम्ही काहीच बोलत नाही. का नाही बोलत, का नाही माझ्याकडे बघत?"

"काय सांगू? तू मला भूल पाडलीस. त्या अप्सरांनीही आम्हा

देवांना लंपट केले. आम्ही निःसत्त्व झालो, कर्तव्यच्युत झालो. महान शत्रू उत्पन्न झाला आहे. तुमच्या विलासात आम्ही दंग राहिलो; परंतु उशाशी सर्प येऊन बसला. तुम्ही बायका अशाच पदच्युत करणाऱ्या. गोड गोड बोलता व आम्हाला जाळ्यात पकडता. हिमालयाला हलवणारे आमचे हात, परंतु तुमचे कोमल हात दूर करता येत नाहीत. दृष्टीतील तेजाने जगाला भस्म करू शकणारे आमचे डोळे, परंतु तुमच्या दृष्टीसमोर ते मिटतात. तुम्ही जादुगारणी आहात. बुद्धीला भ्रंश पाडणाऱ्या आहात. भ्रम पाडणाऱ्या आहात. पुरे तुझे गोड बोलणे.''

''शेवटी आमच्या बायकांच्या डोक्यावरच तुम्ही खापर फोडायचे. चोराच्या उलट्या बोंबा! तुम्ही आमच्याजवळ लाळ घोटीत येता, कुत्री होऊन येता, तर आम्ही काय करावे? तुम्हाला का दूर लोटावे, दूर फेकावे? कठोर होऊन तुम्हाला दूर केले तरी तुम्ही रागावणार. तुम्ही जवळ आलात म्हणून तुम्हाला जवळ घेतले तरी तुम्ही रागावणार! दुर्दैवी आहेत स्त्रिया झाले! तुम्ही पुरुष मात्र निर्दोषी, होय ना? सारे पाप आमच्या शिरी. आम्ही मोहमाया. तुम्ही मोह पाडीतच नसाल? तुम्हाला वासनाच नसतील? आम्हीच जणू तुम्हा पुरुषांच्या जीवनात विषयाचे विषकंद लावतो! काय बोलता, तुम्ही लंपट झालात? ते वरुणदेव नाही झाले ते? आम्ही मोह पाडला; तुम्हाला का पडला? तुमचा विवेक, कोठे चुलीत गेला? तुम्ही का शेण खाल्लेत? तुम्हालाच कर्तव्य मुळी नको. तुम्हाला एक आमचा काम. त्या दिवशी मी नको म्हटले तर किती रागावलात! पेला फेकून दिलात. तुम्हा पुरुषांजवळ कसे वागावे, हेच आम्हाला समजत नाही. पुरुषांचे मन म्हणजे कुत्र्याचे शेपूट. सदैव वाकडे. आम्हाला का बोल? आम्ही संयम आणू पाहतो; परंतु तुम्हाला कोठे हवा?''

''दे, तूही शिव्याशाप दे. वरुणदेवांनी बोलून घेतले, आता तू बोल. तूही मार जोडे. हेच ना पत्नीचे काम? पतीला धीर देण्याऐवजी त्याच्या जखमेवर मीठ चोळणे, हेच ना पत्नीचे काम? पतीची, तो दुःखी असता, निर्भर्त्सना करणे हेच ना पत्नीचे काम?''

“तुमची दुःखी मुद्रा पाहून मी धीरच देऊ पाहत होत्ये. प्रेमाने, मधुर शब्दांनी विचारपूस करीत होत्ये; परंतु तुम्ही एकदम साऱ्या स्त्रियांची नालस्ती सुरू केलीत. मी एक असेन वाईट; परंतु साऱ्या स्त्रियांना का लावता बोल?”

“मी शोकमूढ झालो होतो. दुःखाने विवेक दुरावतो. मला भान नाही राहिले, म्हणून बोललो. शचीदेवी, क्षमा कर. तुझ्या मी पाया पडतो.”

“हे काय काहीतरीच! असे करू नये. आपण नीट बोलू या. कोणता आहे शत्रू, कोणते आहे संकट? सांगा सारे.”

“शत्रूचा अद्याप पत्ताच नाही. त्याने सूर्य व त्याच्या तेजःप्रसवा गाई, सर्वांना गिळले असे म्हणतात. शत्रू कोठे राहतो, त्याचे किल्लेकोट कोठे आहेत, गडगढ्या कोठे आहेत, सारे शोधावे लागेल. वाऱ्याला पाठवणार आहे संशोधनासाठी. पण वारा तरी तयार होईल की नाही कळत नाही. सारे भिऊन गेले आहेत.”

“वायुदेव जातील. कोठून तरी ते घुसतील, वार्ता आणतील.”

“अग, ज्याने सूर्याला तोंड न भाजता गिळले, हात न भाजता धरले, तो वाऱ्याचीही मोट कशावरून बांधणार नाही? सारे चमत्कारिक झाले आहे. मीही उद्या बाहेर पडणार आहे. शत्रूचा नाश करीन तेव्हाच तुला तोंड दाखवीन. विजयी इंद्राला मग पुष्पहार घाल.”

“मला चिंता वाटते. कसे होईल तुमचे?”

“आम्हा देवांना मरण नाही.”

“परंतु क्लेश तर आहेतच. मरण पत्करले, परंतु हे अमृतत्त्व नको. मी येऊ तुमच्याबरोबर?”

“नको. मी अपयशी झालो तर तू ऊठ. स्त्रियांची शक्ती सर्वांच्या शेवटी. कारण तुम्ही यज्ञमूर्ती आहात. पुरुषांपेक्षा तुम्ही यज्ञधर्माची अधिक उपासना करता. मला निरोप दे. कर्तव्य कठोर असते, तुझा बाहुपाश दूर कर.”

“मी तुम्हाला मोह घालणार नाही. माझा बाहुपाश दूर करते. माझा हात तुमच्या खांद्यावर आहे. तो तुम्हाला धीर देण्यासाठी आहे. जा.

स्वधर्म आचरा, स्वकर्म करा. विजयी होऊन या. मग मी तुम्हाला पंचारती ओवाळीन. नाथ, आपण दोघे अतःपर स्वधर्माचा सांभाळ करू, एकमेकांस सत्पथावर ठेवू. जा. तुम्हाला यश येवो अशी मी प्रार्थना करीन. दुसरे काय करणार?''

''प्रार्थना कर. प्रार्थना ही मोठी शक्ती आहे. प्रार्थनेने पर्वत विरघळतात. समुद्र मार्ग देतात. पवित्र प्रार्थना. तिने काट्यांची फुले होतात, पाषाणांची पारिजाते होतात. प्रार्थना. तिने भयंकर भुजंगांचे सुकुमार हार होतात. व्याघ्रवृक हरणांप्रमाणे जवळ येतात. प्रार्थना म्हणजे अंधारात प्रकाश, मरणोन्मुखास जीवन. शचीदेवी, प्रार्थना कर. विश्वाचे मंगल व्हावे म्हणून निर्मळ, निःस्वार्थ प्रार्थना कर.''

''करीन. करीन. जा आता तुम्ही.''

''आता तू खरी इंद्राणी, शुचिव्रता, शचीराणी.''

इंद्र निघून गेला. शचीराणी निरोप देऊन परत आली व प्रार्थना करीत बसली. इंद्राची व वृत्राची शेवटी लढाई सुरू झाली. तेहेतीस कोटी देव एका बाजूला व एकटा वृत्र एका बाजूला. परंतु वृत्र हरेना. 'आ' पसरून वृत्र धावत येई व वातध्वस्त मेघाप्रमाणे देवांची वाताहत होई. तो क्षणात सूक्ष्म होई, क्षणात आकाश व्यापून राही. अग्निदेव प्रचंड ज्वालांनी त्याला जाळायला जाई; परंतु वृत्राला काही होत नसे. झंझावात वायुदेव सोडी; परंतु वृत्र जागचा हलत नसे. वृत्र आगीने जळेना, पाण्याने भिजेना; वाऱ्याने हलेना. सारे देव हतबल झाले, हतबुद्ध झाले. देवेन्द्राने आपले नाना रंगी धनुष्य हाती घेतले. प्रखर बाण त्याने सोडले; परंतु वृत्राला ती पुष्पांची वृष्टी वाटे. इंद्राने सोडलेले प्राणघेते बाण वृत्रासुर काटक्यांप्रमाणे मोडी व फेकून देई. शेवटी इंद्राने ते वज्र हाती घेतले. सारे त्रिभुवन डळमळू लागले; परंतु वृत्र निर्भयपणे उभा होता. ते वज्र चेंडूप्रमाणे झेलण्यासाठी उभा होता. इंद्राचे डोळे रागाने इंगळासारखे लाल झाले होते. सोसाट्याचा वारा सुटला. अग्नी ज्वाळांनी ब्रह्माण्ड जाळायला उभा राहिला. इतर देवांचेही प्रयत्न सुरू झाले. इंद्राने क्रोधाने पाहिले. वृत्रासुराचे वक्षस्थल

लक्षून ते वज्र सोडले गेले. तो जळजळीत लोखंडी गोळा कडाडत चालला. चराचराच्या कानठळ्या बसल्या. मृतवत पडलेली मुले आयांच्या अंगाला अधिकच एकदम बिलगली.

प्रलयकाल ओढवला असे सर्वांस वाटले; परंतु तो वृत्र उभा होता. प्रचंड घोष करीत वज्र आले. 'हतस्त्वं पाप जाल्म' अशी तेहतीस कोटी देवांनी वीरघोषणा केली. वृत्रानेही गर्जना केली. त्याने दंड थोपटले. एक हात त्याने पुढे केला. तो जळणारा गोळा आपल्या बचकेत तो धरणार होता. आले, वज्र आले. जवळजवळ आले. देवांची हृदये आशा-निराशेने खाली-वर होत होती. वृत्र मरणार की मारणार?

पकडले, वृत्राने ते प्रचंड वज्र पकडले. त्याने त्याचे शेकडो तुकडे केले. ते तुकडे त्याने दशदिशांत भिरकावले. ते इकडे पर्वतांचा निःपात करते झाले. तारांचा चुरा करते झाले. वज्र मोडून तोडून वृत्राने प्रचंड हाक फोडली, "आलो, देवेन्द्रा! आलो. सावध रहा. पळू नको आता. पाठ नको दाखवूस. आलो!" असे गर्जत व प्रचंड जबडा पसरून वृत्र धावला. इंद्र पळू लागला. सारे देव पळू लागले. इंद्राच्या पाठोपाठ वृत्र येत होता. इंद्र शेवटी शचीराणीच्या अंतःपुरात शिरला. शचीराणी दारात उभी राहिली. वृत्र हसला. "बायकांवर हात टाकणारा मी नाही. बायकांपासून रक्षण मागणाऱ्यावर मी प्रहार करीत नसतो.' असे म्हणून वृत्र निघून गेला.

सर्व देवांना आता विचार पडला. काय करावे ते कोणासच कळेना. सर्वांची मती कुंठित झाली. संकटात ज्याची बुद्धी अधिकच स्फुरते, तोच खरा बुद्धिमान. असा बुद्धिमान देवात कोण होता? सारे विश्व नष्ट होणार, असे त्यांना वाटले. आपण आपली शक्ती गमावली, असे त्यांना वाटले. ते मनात चुटपुटू लागले. मानवांची मदत घ्यावी, असा विचार निघाला, परंतु मानवांतही कोठे होता राम? मानवही मरून पडले होते. थंड गोळे झाले होते.

"आपण देवही जेथे व्रतच्युत झालो, तेथे मानवांची काय कथा? देव विलासी व विषयलंपट झाले, मग मानव काय निराळ्या मार्गाने

गेले असतील? मानव आपणाहूनही क्षीणशक्ती झाले असतील. अंतर्बाह्य पोखरले गेले असतील. ते काय आधार देणार, कोणते साहाय्य करणार?'' असे काही देव म्हणाले.

''परंतु मानवात कोणी आहे का महात्मा, ते पाहायला काय हरकत? खोटा अहंकार नको. धर्माचे सिंहासन कोठे असेल, त्याचा नेम नसतो. मोठमोठे घसरतात, तेथे लहान तरतात. मर्त्यभूमीच्या लोकांनी आपणास अनेकदा साहाय्य केले आहे. मानवांचे ते उपकार विसरू नका. कोणीही कोणास तुच्छ लेखू नये.'' बृहस्पती म्हणाले.

''गुरुदेवांचे म्हणणे बरोबर आहे. आपणा सर्वांस मागे एकदा गर्व झाला होता, परंतु त्या ज्ञानदेवतेने सर्वांचा गर्व जिरवला. त्या वेळेस अग्नीला काडी जाळवेना, वाऱ्याला काडी हालवेना, परमेश्वरी शक्ती कोठे असेल त्याचा नेम नाही. आपले पाप झाले तेवढे पुरे. आता आणखी आढ्यतेचे व गर्वाचे पाप तरी नको.'' इंद्र म्हणाला.

''मानवजातीत कोणी आहे का महात्मा, हे पाहण्यासाठी वरुणदेव जाणार होते ना?'' अग्नीने विचारले.

''हो. ते असे म्हणाले होते. चला, आपण सारे त्यांच्याकडे जाऊ.'' इंद्र म्हणाला.

सारे देव वरुणराजाकडे आले. वंदन करून देवेन्द्र म्हणाला, ''हे धृतव्रता वरुणराजा, शत्रूचे पारिपत्य करण्यास आम्ही असमर्थ आहोत. रिपू हटत नाही. आम्हास मार्ग सुचत नाही. माझे अमोघ असे वज्र, तेही त्या वृत्रासुराने काडीप्रमाणे मोडले. अशा प्रबळाशी कोण झुंजणार? सारी शस्त्रास्त्रे व्यर्थ आहेत. मला तरी सृष्टीचा अंत आला असेच वाटत आहे.''

वरुणदेव म्हणाले, ''शचीपते, तू म्हणतोस ती गोष्ट खरी. कोणातच आज त्राण नाही. व्रताचे तेज नाही. तुम्ही देव दुबळे झालात. मानवही तसेच. मानवांत मला पराक्रम दिसला नाही. काही महात्मे दिसले, परंतु वृत्राला दूर करील असे तेज त्यांच्याजवळ नाही. मी सारी पृथ्वी शोधली. निराश होऊन परत येणार होतो, परंतु मला एकदम दिव्यसुगंध

आला. मी त्या दिशेकडे वळलो. तेथे मला एक महान विभूती आढळली. त्या विभूतीच्या तेजाने तुझे काम होईल.''

''कोठे आहे ती विभूती ? कोठे आहे तो महात्मा ? सांगा, त्याचे निवासस्थान सांगा. आम्ही सारे देव तेथे जाऊ व त्याच्या पाया पडू. त्या महात्म्याला स्तुतीची स्पृहा नसेल. आमचे प्रणाम पाहून तो गजबजेल. स्तुतीने त्यांना आम्ही मोह पाडू नाही इच्छित. त्यांना पडणारही नाही. आम्ही त्यांच्या पायांवर लोळण घेऊन म्हणू, 'त्रिभुवनाचे रक्षण करा.' वरुणदेवा, काय त्या विभूतीचे नाव? धन्यतम नाव? हा तप:सूर्य कोठे तपत आहे? हा भूदेव कोठे वसत आहे?'' अशी सर्वांनी पृच्छा केली.

वरुणदेव म्हणाले, ''इंद्रा, सुरश्रेष्ठा, त्या भूमीतील राजर्षींनी पूर्वी तुला अनेकदा साहाय्य दिले; ज्या भूमीत यज्ञाची, त्यागाची महती सदैव गाइली जात असते, जेथे लोक स्वधर्माचरण नीट व्हावे म्हणून थोडीफार तरी धडपड करीत असतात, त्याच भरतभूमीत तो महात्मा आहे. त्या भरतभूमीच्या पश्चिम दिग्भागी साबरमती नदीच्या तीरावर तो महात्मा तप करीत आहे. अत्यंत निर्मळ व पवित्र आहे त्याचे जीवन. निरहंकार, निष्काम मूर्ती, त्याच्याकडे सारे जाऊ या. साहाय्य मागू या.''

''परंतु कोणती मदत मागायची?'' देवेन्द्राने विचारले.

सुदगुरू म्हणाले, ''सर्व शस्त्रास्त्रांपेक्षा पवित्र हृदय अधिक प्रभावशाली असते. अग्नीला शीतलविणारे, पर्वतांना पाझर फोडणारे, वाऱ्याला थांबविणारे, वज्राला फुलाप्रमाणे करणारे, असे एक संताचे हृदय असते. ते फुलाहून कोमल असते. वज्राहून कठोर असते. महात्म्यांच्या रोमरोमांत अपरंपार शक्ती भरलेली असते. सर्व त्रिभुवनाशी ते एकरूप झालेले असल्यामुळे सर्व त्रिभुवनाचे सामर्थ त्यांच्या जीवनात असते. त्यांचा दृष्टिक्षेप, यात अपार सामर्थ्य असते. देवेन्द्रा, त्या महात्म्याजवळ त्याचे हृदय आपण मागू. त्या महात्म्याचा सारा देहच पवित्र. त्यात हृदय अधिकच पवित्र. त्या हृदयाच्या अस्थी आपण मागू. त्या

अस्थींचे कोण चूर्ण करील ! त्या अस्थी अभंग आहेत. अमर आहेत. त्या अस्थींचे आपण वज्र करू. हृदयाला वेढून असणाऱ्या अस्थी. भोवती त्या अस्थी बसवू. मध्ये हृदय बसवू. असे ते अस्थिमय हृदय वज्राकार करून वृत्रावर फेकू. वृत्राचे पाणी पाणी होईल. वृत्र नाहीसा होईल.''

वरुण म्हणाला, ''देवगुरूंचा सल्ला ठीक आहे. असेच करावे.''

इंद्राने विचारले, ''त्या महात्म्याचे नाव काय ?''

वरुण म्हणाला, ''दधीची.''

दधीची लहानपणी फार व्रात्य होता. आई-बापांना त्याची चिंता वाटे. पुढे त्यांनी त्याला एका आश्रमात ठेवले. आईबाप निघून गेले. गुरुगृही दधीची राहू लागला. त्याचे अध्ययनाकडे फारसे लक्ष नसे. आश्रमातील गाईंना चारायला नेणे त्याला आवडे.

''गुरुजी, मी गाईंना चारायला नेईन, म्हणजे मला दूधही पुष्कळ पिण्यास मिळेल.'' दधीची म्हणाला.

''ने गाई चारायला. पी पुष्कळ दूध.'' गुरुदेव म्हणाले.

दधीची गाईंना आंजारीगोंजारी. त्यांच्यासाठी पावा वाजवी. रानात पळसाच्या पानांचा द्रोण करून ते गाईखाली बसे. गाई दूध देत. दधीची द्रोण भरभरून पिई. मग वानराप्रमाणे तो झाडावर चढे किंवा पाण्यात डुंबे. मजा करी.

दधीचीचे हाडपेर मोठे होते. तो आता मोठा दिसे. सिंहासारखी त्याची छाती होती. खांदे रुंद होते. तोंडावर एक प्रकारचे तेज दिसे. आश्रमातील सारी मुले त्याला भीत. त्याची खोडी कोणी काढीत नसे. कोणी काढली खोडी, तर त्याची कंबक्ती भरलीच समजा!

एके दिवशी गुरुदेव शिष्यांना काही सांगत होते. सायंप्रार्थना होऊन गेली होती. सारे छात्र मंडलाकार बसले होते. गुरुदेवांची गंगौघाप्रमाणे पवित्र, प्रशांत वाणी सुरू झाली. ते म्हणाले, ''सामर्थ्याशिवाय सारे व्यर्थ. संसारात सामर्थ्य हवे. सामर्थ्याने सारे मिळते. सामर्थ्यवंताला

सारे शोभते. सामर्थ्य म्हणजे सौंदर्य, बळाची उपासना करा. बळाने सारे चराचर चालते. बळाने ही पृथ्वी उभी आहे, पर्वत उभे आहेत. बळाने हे अनंत आकाश आधाराशिवाय वर पसरले आहे. चंद्रसूर्यांना, अगणित तारकांना आधार देत आहेत. बळामुळे सूर्य, चंद्र, तारे प्रकाशतात. बळाने वारा वाहतो, बळाने समुद्र उसळतो, बळाने नद्या वाहतात.

तुम्ही आश्रमात आहात. बळ असेल तर तुम्ही उठाल, हिंडाल, फिराल. बळ असेल तर बराच वेळ बसाल, बळ असेल तर बराच वेळ चालाल. बळ असेल तर अध्ययन करता येईल, अनेक ठिकाणी जाऊन ज्ञान मिळवता येईल. बळ असेल तर पृथ्वी खणाल, तिला सस्यसंपन्न कराल. बळ असेल तर दुसऱ्याच्या उपयोगी पडाल. ही सारी पृथ्वी बलवंताची आहे. दुबळ्याला काहीएक मिळायचे नाही. दुबळ्यांना पदोपदी भीती. दुबळ्यांना ना मान, ना स्थान; ना विद्या ना ज्ञान. तुम्ही दुबळे नका होऊ. बलवंत व्हा. आश्रमातून परत जाल तेव्हा तेजस्वी शरीरे घेऊन जा. लाथ मारीन तेथे पाणी काढीन, अशी हिंमत घेऊन जा. पायाखाली धरित्री डळमळते आहे, अशा ऐटीने जा. दधीचीकडे बघा. कसे आहे वज्रासारखे शरीर. तो झाडाला उपटील, दगडाचे चूर्ण करील, सापाला गरगर फिरवून त्याचे मणके ढिले करील. त्याला वाघसिंहाचे भय नाही, भुताखेतांचे भय नाही, तो निर्भय आहे, तो मुक्त आहे. समजलेत ना! शक्तीची उपासना करा. बलहीनाला ना संसार, ना परमार्थ. बलहीनाचे जिणे व्यर्थ आहे.''

प्रवचन संपले. दधीची आनंदला. त्याला मुले चिडवीत असत. 'माजला आहे नुसता' असे म्हणत, परंतु आज गुरुदेवांनी एक प्रकारे त्याची बाजू मांडली होती.

''आता हसाल का मला? आता तुम्हीही माझ्याप्रमाणे दूध प्याल, खेळाल, कुदाल, चढाल, डुंबाल.'' दधीची म्हणाला.

''परंतु तुझ्याप्रमाणे ज्याला त्याला थपडा देणार नाही!'' एकजण म्हणाला.

"तुझ्याप्रमाणे नुसते खातच बसणार नाही." दुसरा म्हणाला.

"मनुष्य म्हणजे काही केवळ हेला होणं नव्हे. बैल होणं नव्हे." तिसरा म्हणाला.

"बैल होणे का वाईट? बैल किती उपयोगी! बैलाची तर देवांना उपमा देतात. अग्नी कसा आहे? तर 'वृषभो रोरविती' असे नाही का वर्णन?" दधीचीने विचारले.

"बरेच लक्षात राहिले रे तुझ्या?" कोणी हिणवीत म्हणाला.

"मनात आणीन तर सारे लक्षात ठेवीन." दधीची म्हणाला.

सारे छात्र झोपले. गुरुदेवांच्या बलोपासनेच्या प्रवचनामुळे दधीचीला ताम्रपटच मिळाल्यासारखा झाला होता. त्याने एखाद्या मुलाला एकदम वर उचलावे, एखाद्याला पाठीत गुद्दा द्यावा. कधी झाडांना आपल्या अंगाची धडक द्यावी. कधी बैलांची शिंगे धरून त्यांना हलू देऊ नये, असे शक्तीचे प्रयोग त्याचे चालत.

त्या दिवशी पुन्हा सायंप्रार्थना झाली. सारे छात्र मंडलाकार बसलेले होते. गुरुदेव सांगत होते. छात्र लक्ष देऊन ऐकत होते. शांत वाणी स्रवत होती. अमृतवर्षाव जणू होत होता, "मुलांनो, बळाची उपासना करा, असे त्या दिवशी मी सांगितले. त्या बळाचेच आणखी विवरण मी करणार आहे. बळ नाना प्रकारचे आहे. आपण उत्तरोत्तर श्रेष्ठ बळाकडे गेले पाहिजे. शरीराचे बळ हे प्राथमिक बळ. ते पशूंजवळही असते. शरीराच्या बळापेक्षा बुद्धीचे बळ अधिक आहे. अर्थात बुद्धी शरीरातच असणार, म्हणून शरीरही बलवान पाहिजे. शरीराची उपेक्षा नका करू; परंतु शारीरशक्ती म्हणजेच सर्वस्व, असे नका मानू.

आपणास अनेक पायऱ्या चढून वर जायचे आहे. शारीरबळ ही पहिली पायरी. परंतु सदैव का पहिल्या पायरीवरच राहावयाचे? यासाठी ज्ञानाची दुसरी पायरीही चढा. ज्ञान मिळवा. बुद्धी प्रभावशाली करा. परंतु ज्ञानाच्या बळानेही सारे संपले असे नाही. हृदयाचेही बळ आहे. हृदय शुद्ध राखणे, भावना निर्मळ ठेवणे हेही बळ आहे. प्रेम हीही एक शक्ती आहे. एखाद्या मुलाला तुम्ही मारून समजावू शकणार

नाही, बुद्धिवादाने समजावू शकणार नाही. परंतु माता त्याच्या पाठीवर नुसता हात फिरवील व त्याला समजावू शकेल. एखादा घोडा चाबकाने ऐकणार नाही, परंतु प्रेमाने पाठ थोपटताच तोही प्रेमाने फुरफुरेल.

अंगबळ ही पहिली पायरी. ज्ञानबळ ही दुसरी पायरी. प्रेमाचे बळ ही तिसरी पायरी. परंतु मनोजयाचे बळ ही चौथी पायरी. ज्याने मन जिंकले नाही, त्याला ना शरीराचे बळ, ना ज्ञानाचे बळ, ना प्रेमाचे बळ. म्हणून मनावर जो स्वार व्हायला शिकला, तो जगावर स्वार होईल. मनाचा जो स्वामी झाला तो त्रिभुवनाचा स्वामी होईल. एखाद्या मस्त घोड्याला दधीची वठणीवर आणील; परंतु मस्त मनाला वठणीवर आणील तोच खरा. त्या दिवशी दधीची दंड फुगवून बकुळ वृक्षाला धडका देत होता. परंतु दधीची ज्या दिवशी मनातील सारे वेग रोखू शकेल, त्याच दिवशी खरे बळ त्याने मिळविले, असे होईल.

बाळ दधीची, तू मला आवडतोस. त्या दुबळ्यांपेक्षा तुझ्याकडे पाहून प्रसन्न वाटते. परंतु पुढे जा. श्रेष्ठतर बळांची उपासना कर. व्याघ्रसिंहाचे हे शारीरिक बळ तेही थोर आहे; परंतु मानवाने या बळाहून अन्य बळ संपादन करावे. ज्ञानबळ, प्रेमबळ, मनोजयाचे बळ आणि शेवटी साऱ्या त्रिभुवनाशी एकरूप होण्याचे बळ. ज्याला आपपर नाही, सर्व स्थिरचरात एकच शक्ती भरलेली आहे, हे ओळखून त्या शक्तीशी जो एकरूप झाला, त्याच्या बळासमोर सारी बळे फिकी आहेत. इतर सारी बळे त्या परमैक्याच्या बळासमोर साष्टांग नमस्कार घालतील. मानवाचे हे परमध्येय, ही परम गती. हे मन्तव्य, हाच मोक्ष. या लहानशा शरीरात राहून साऱ्या विश्वाशी एकरूप होणे, ते अंतिम बळ. शेवटी त्या बळाची उपासना करा.''

प्रवचन संपले. छात्र निघून गेले. ते झोपले. परंतु दधीचीला झोप येईना. तो बळाचा उपासक होता. खऱ्या सामर्थ्याचा उपासक होता. तो आश्रमातील अंगणात फेऱ्या घालीत होता. तो विचारात मग्न झाला. हळूच दधीचीच्या खांद्यावर कोणी तरी हात ठेवला. त्याने वळून पाहिले, तो कोण?

"गुरुदेव!" तो सकंपवाणीने म्हणाला.

"काय बाळ?"

"मी उत्तरोत्तर उच्च बळाकडे कसा बरे जाईन? खरे बळ मला मिळू दे. तुमचा आशीर्वाद द्या."

"मिळेल तुला ते परमश्रेष्ठ बळ. माझा आशीर्वाद आहे. जा आता व शांतपणे झोप. तू महापुरुष होशील."

प्रमाण करून दधीची गेला व विचार करीत करीत झोपी गेला.

दधीचीचे आता खाण्यापिण्यात लक्ष नसे. तो ना फळ खाई, ना दूध पिई. तो पाण्यात आता डुंबत नसे, पहाड चढत नसे. तो विचारातच मग्न असे. आश्रमातील मुले त्याची थट्टा करीत.

"दधीची, अरे, ती फळांची टोपली फस्त करून टाक ना! ती फळे केव्हाची तुझी वाट पाहत आहेत."

"आपला उदार आश्रयदाता आज कोठे गेला, असे मनात येऊन ती फळे रडत आहेत."

"तुझ्या पोटाच्या पेटाऱ्यात जाऊ देत बाबा ती!"

"खात जा बाबा, नाही तर हे दोर्दंड दोरीसारखे होतील."

"हे हत्तीसारखे पाय करकोचाच्या पायासारखे होतील."

"आपली त्याच्यावर दृष्ट पडली बहुधा!"

"म्हणून का स्वारीला खाण्याचा वीट आला?"

"अरे, खाऊन खाऊनच तो विटला. किती खाणार?"

दधीची सारे शांतपणे ऐकत होता. तो कोणाच्या अंगावर धावून गेला नाही. पूर्वीचा दधीची राहिला नाही. पूर्वीचा दधीची असे कधीच ऐकून घेता ना. तो कोणाच्या थोबाडीत मारता, कोणाच्या छातीवर बसता, कोणाला बुकलता, बुक्क्या देता. सारा आश्रम तो गजबजवून सोडायचा; परंतु आज सिंह शांत झाला होता. दधीची शांत पारवा बनला होता. आज ना धडपड, ना फडफड. दधीची चिडत नाही असे पाहून मुलेही गंभीर होऊन निघून गेली.

दधीची आज आश्रमातून घरी जाणार होता. गुरुगृह सोडून

गृहस्थाश्रमात पदार्पण करण्यासाठी जाणार होता. सर्वांना वाईट वाटत होते. तो सर्वांचा निरोप घेत होता. आश्रमातील चैतन्य जणू जात होते. आश्रमातील खेळकरपणा, उत्साह, शक्ती जणू आज जात होती. दधीची गुरुदेवांच्या पाया पडला. त्यांनी त्याला हृदयाशी धरिले व सांगितले, "जा! नीट रहा! प्रपंचच परमार्थमय कर. सूर्य जाईल तेथे प्रकाश नेईल. गंगा जाईल तेथे ओलावा देईल. तू ज्ञानाचा प्रकाश, प्रेमाचा ओलावा सर्वत्र घेऊन जा. संसारात आनंद पिकव. स्वतः आनंदी हो, आसमंतात असलेला समाज तोही आनंदी कर. संयम सोडू नकोस. वासनांवर विजय मिळव. भावना निर्मळ ठेव. बुद्धी विशाल ठेव. दृष्टी निर्मल ठेव. जा. माझा तुला आशीर्वाद आहे."

दधीचीने गृहस्थाश्रम स्वीकारला. तो आईबापांची सेवा करी, स्वतः कृषी करी. त्याने सुंदर फळझाडे लावली, फुलझाडे लावली. शेतात खपावे, मळ्याला पाणी द्यावे, रात्री ताऱ्यांचे चिंतन करावे, असा चालला वेळ. तो रानातील रसाळ फळे आणी व आई-बापास देई. सुंदर फुले आणी व त्यांना देई. त्यांची वस्त्रे तो धुई, त्यांचे पाय तो चेपी; परंतु वृद्ध मातापितरे किती दिवस राहणार? दधीचीला आशीर्वाद देत ती देवाघरी गेली.

दधीची मुलाबाळांजवळ प्रेमाने वागे. त्यांच्याजवळ खेळे, हसे. पत्नीबरोबर कधीही त्याचे भांडण झाले नाही. त्याच्या मुखावरची प्रसन्नताच काही अपूर्व होती. त्याचे मुखमंडल पाहताच दुसऱ्यांच्या कपाळावरील आठ्या मावळत व तेथेही प्रसन्नता फुले. प्रसन्नतेचा स्पर्श व्यापक आहे.

दधीची शेतात खपे. वाईट गवत खणून काढी. ते काम करता करता त्याच्या मनात येई, 'ही पृथ्वी निर्मळ व्हावी म्हणून मी खपत आहे. येथे पुष्टी देणारे धान्य वाढावे म्हणून हे विषारी गवत, निरुपयोगी गवत मी खणून फेकीत आहे. माझ्या हृदयाची भूमी केली आहे का निर्मळ? तेथील वासनांचे सारे गवत टाकले आहे का उपटून?' असे विचार मनात येऊन तो तसाच तेथे बसे.

हळूहळू हे विचार अधिकच येऊ लागले. त्याला काही सुचेना, रुचेना. त्याला गुरुदेवांचे शब्द आठवले : 'मनोजयाचे बळ आणि शेवटी चराचराशी एकरूप होण्याचे बळ. उत्तरोत्तर पुढे जा.' तो अस्वस्थ झाला. दधीची दुःखी झाला. पत्नीने असा दुःखी चेहरा कधी पाहिला नव्हता. ती एके दिवशी पतीला म्हणाली,

"तुम्हाला काय होते? अशी का अलीकडे मुद्रा? प्रसन्नता कोठे गेली? हास्य कोठे गेले? आनंद का अस्तास गेला? मला नाही का सांगणार? मी का निराळी आहे?"

"तू निराळी नाहीस. मी तुझ्याशी, या आपल्या मुलाबाळांशी, या आपल्या संसाराशी एकरूप आहे. परंतु मला वाढू दे. साऱ्या त्रिभुवनाशी मला एकरूप होऊ दे. साऱ्या विश्वाशी माझा आत्मा नेऊन भेटवू दे. तू देशील मला अनुज्ञा? जाऊ का मी वनात? तपश्चर्या करीन, विश्वाशी एकरूप होईन. जाऊ?"

"तुम्हाला तोच ध्यास लागला असेल तर जा. मी तुम्हाला अडवीत नाही. मी मुलाबाळांना वाढवीन. या कळ्या फुलवीन. तुम्ही खरेच जा. चिंता नका करू. तुमचा आनंद तो आमचा. तुमच्या मोक्षाने आम्ही मुक्त होऊ. एक सूर्य सर्व जगाला प्रकाश देतो. जगाला प्रकाश देण्यासाठी जा. सूर्य व्हा. माझा पतिदेव वाढो, वरती जावो, कृतकृत्य होवो, अशी मी प्रार्थना करीन."

"कर प्रार्थना. प्रार्थना म्हणजे बळ. प्रार्थनेने अप्राप्य प्राप्य होते, अशक्य शक्य होते. तुझ्या पतीसाठी प्रार्थना कर. ती प्रार्थना मला प्रेरणा देईल, पुढे नेईल."

दधीचीने मुलांच्या अंगावरून हात फिरवला. त्यांच्या मुखकमलांचे अवघ्राण केले. निजली होती ती. पिता जागा व्हायला जात होता. पत्नी अंगणापर्यंत आली.

"जातो. मुलांना जप."

"जा, विजयी व्हा, कृतकृत्य व्हा."

"जा आता मागे."

"तुम्ही जा आता पुढे."

"जाऊ, का राहू?"

"जा, मागे पाहू नका. तुमच्या जीवनाचा पतंग उंच जाऊ दे. आम्ही ती शोभा पाहू व पवित्र होऊ."

"किती तुझा धीर! खरी आदर्श पत्नी."

"तुमची आकांक्षा ती माझी. तुमचा विजय तो माझा. तुमचे भाग्य ते माझे. कोठेही गेलेत तरी माझेच आहात. माझ्या हृदयात राहून मग चराचरांचे व्हाल. खरे ना? तो पहा ध्रुव. निश्चल तेजस्वी तारा."

"मलाही होऊ दे स्थिर, करू दे निश्चय. ध्रुव दाखवलास, ध्रुवाप्रमाणे अविचल होऊ दे मला. जातो."

दधीचीने पत्नीचा हात सोडला. त्याने आता मागे पाहिले नाही. सरळ निघाला. पत्नी थरथरत उभी होती. तिचे डोळे आता भरून आले. तिने हात जोडले, तिने प्रार्थना केली. ती घरात आली. तिने चिमुकल्यांचे मुके घेतले. सर्वांत लहानाला कुशीत घेऊन ती पडली.

तपश्चर्येला योग्य असे स्थान दधीची बघत होता. साबरमतीचे पवित्र व प्रशान्त तीर त्याला आवडले. शुद्ध, स्वच्छ स्रोतवती साबरमती. वरच्या अनंत आकाशाचे स्वच्छ प्रतिबिंब तिच्यात पडलेले दिसे. आपल्या निर्मळ हृदयात परम सत्याचे प्रतिबिंब एक दिवस असेच पडेल, असे दधीचीस वाटले. साबरमतीच्या तीरावर उंच वृक्ष होते. माझे मनही असेच उंच होईल, देवाजवळ हितगूज करील. जवळ येतील त्यांना मी छाया देईन. जवळ असेल ते देईन. आधार देईन. या वृक्षाप्रमाणे होईन, असे दधीची मनात म्हणाला.

साबरमतीच्या तीरावरील वनात हिंस्र पशू नव्हते. सिंह, वाघ नव्हते. अस्वल- लांडगे नव्हते. त्या वनात खेळकर हरणे होती. कधी वनगाईंचे कळप दिसत. तसेच मोर, पिक, शुक, मैना हे पक्षीही होते. सुंदर गोड कलरव करणारे पक्षी. नदीची गुणगुण, पक्ष्यांचा कलरव, अलिगणांचा गुंजारव, पानांचा मर्मरध्वनी– याशिवाय तेथे आवाज नव्हता. तपश्चर्येला अनुकूल जागा. मन शांत होण्यासाठी योग्य जागा.

दधीचीने तेथे लहानशी पर्णकुटी बांधली. त्याने तप आरंभिले.



मोठ्या पहाटे तो उठे. आकाशातील सप्तर्षी आकाशगंगेत स्नाने करीत व दधीची साबरमतीत स्नान करी. स्नानानंतर दर्भासन घालून त्यावर तो बसे. तो वृत्ती स्थिर करी, वासना संयत करी, भ्रमंती करणाऱ्या मनाला हृदयात निश्चल करू बघे.

दधीची प्रथम थोडी कंदमुळे खात असे; परंतु पुढे तेही त्याने सोडले. झाडावरचे फळ तो पाडीत नसे. पडलेले खात असे. काही दिवसांनी त्याने पर्णाशन आरंभिले: परंतु पुढे पाने तोडून खाण्याचे त्याने बंद केले. पडलेली पानेच तो खाई. अशा रीतीने तो स्वाद जिंकून घेत होता. बाह्यरसाची रुची नाहीशी झाली. बाह्य रसांची आसक्ती कमी झाली. हृदयात रसासागर उचंबळू लागला. 'रसानां

रसतमः’ असा परमानंद हृदयात भरू लागला. दधीचीला अत्यंत प्रसन्न असे वाटू लागले. वेग नाही. आवेग नाही. धडधड नाही, धडपड नाही. इच्छा नाही, काही नाही. चित्त निर्विषय व निर्विकार झाले. अपार शांती जीवनात आली. ती तोंडावर फुलली, डोळ्यांत शोभली.

दधीचीच्या जीवनात परंज्योती प्रकट झाली. आतील प्रकाश बाहेर आला. त्याचे शरीर जणू कर्पूराचे आहे की काय असे दिसे. कधी कधी त्या शरीरावर सुवर्णाची झाक मारी. ते शरीर सोन्याप्रमाणे सोज्ज्वल होते व फुलाप्रमाणे हलके होते. जणू जीवात्म्याला पांघरवलेली भक्तिप्रेमाची शुद्ध शुभ्र शाल. जणू जीवात्म्याला पांघरवलेला ज्ञानाचा झगझगीत पीतांबर. ते शरीर शरीर नव्हते. ते जणू चिदंबर होते. तो देह म्हणजे जणू एक रम्य सुवर्णमंदिर होते व त्या सुवर्णमंदिराच्या आवारात अमृत-सर निर्माण झाले.

दधीचींचा देह पाहून पाखरे वेडी होत, हरणे वेडी होत. दधीचींच्या श्वासोच्छ्‌वासातून दिव्य सुगंध बाहेर पडे. त्यांचे ते डोळे आणि त्यांतील ती बुबुळे– शक्तिपुटातून काळ्या रंगाचे निर्मळ मोतीच बाहेर पडत आहेत असे वाटे. अर्धोन्मीलित असे ते डोळे असत आणि दात म्हणजे जणू हिऱ्यांची पंक्ती, मोत्यांची आवली! दधीचींच्या अंगावर आनंदाचे रोमांच उठत व अष्टभाव दाटून स्वेदकणिका उठत, त्या वेळेस अनंत ताराच अंगावर आहेत असे वाटे.

दधीची कधीकधी अत्यंत एकाग्र होत. त्या वेळेस पक्षी त्यांना प्रदक्षिणा घालीत, हरणे चरणांशी बसत. जणू स्थिरतेचे धडे त्यांना मिळत असत. समाधी सुटावी व दधीचींच्या डोळ्यांतून प्रेमाश्रूंचे शत पाझर सुटावेत. मांडीवर पक्ष्यांनी बसून चंचुपुटे हळूच वर करून ते घळघळणारे अश्रू गिळावेत. असा आनंद, परमानंद त्या वनात भरला. दधीची स्थिरचराशी एकरूप झाले. प्रेमाने सर्व ब्रह्माण्डाशी मिळून गेले.

त्यांच्या प्रेमाचा, त्यांच्या आनंदाचा, त्यांच्या समवृत्तीचा परिणाम आसपासच्या चराचर सृष्टीवर होऊ लागला. त्या तपोवनातील पक्षी भांडत नसत. साप मुंगसाजवळ खेळे व मोरासमोर प्रेमाने डोले.

नागाचा फणा पाहून मोरही प्रेमाने पिसारा उभारी. एकदा सौराष्ट्रातील एक सिंह-मिथुन चुकून या साबरमतीच्या तपोवनात आले. त्या वनात येताच त्यांचे जीवन बदलले. शरीरातील अणुरेणू बदलत आहे असे त्या सिंह-जोडप्याला वाटले. समोरून हरणे आली. मृगेंद्रासमोर मृग नाचत आले. सिंहाने त्यांना चाटले. हरणांनी शिंगांनी त्याची आयाळ विंचरली. सिंहिणीला नाचावेसे वाटले, सिंह व सिंहीण हरणांबरोबर आश्रमाकडे गेली. दधीची एका तरुतळी बसले होते. सिंह व सिंहीण प्रदक्षिणा घालती झाली. हरणांबरोबर नांदू लागली.

त्या तपोवनातील तरू, लता, वेली सदैव टवटवीत दिसत. जणू दधीचीच्या प्रेमातून त्यांना ओलावा मिळे, ऊब मिळे. झाडावरची फुले अधिक सतेज व सुगंधी झाली. फळे अधिक सुंदर व रसाळ झाली. साबरमतीचे पाणी अधिकच स्वच्छ व मधुर असे झाले. पाखरांच्या पंखांचा रंग अधिकच खुलू लागला. सर्वांना जणू अमृताचा स्पर्श झाला. अमर रसायन मिळाले.

एखाद्या दिवशी समाधी सोडून प्रेमभराने दधीची नाचू लागत. जणू ते प्रेम जगाला देत, दोन्ही हातांनी वाटीत. ते नाचू लागले म्हणजे मोर नाचू लागत. सारी पाखरे नाचू लागत. हरणे नाचू लागत, साप डोलू लागत. तरू, लता, वेली नाचू लागत, साबरमतीचे पाणी नाचे, तेथील कंकर नाचत, वाळवंटातील कण थै थै नाचत. पृथ्वीला नाचावेसे वाटे. आसपासच्या टेकड्या नाचात सामील होत. सकल चराचराचा जणू विराट प्रेममय नाच सुरू होई आणि वारा प्रेमाचे सामगीत म्हणे.

असा हा तपःसूर्य तेथे तापत होता. प्रेमचंद तेथे शोभत होता. त्याच्या प्रेमाची ऊब जगाला मिळत होती. म्हणून जगाला धुगधुगी होती. परंतु दधीचींना त्याची जाणीव नव्हती. त्यांचा अहं मेला होता. त्या शरीरात आता दधीची नव्हते राहत. त्या शरीरात विश्वमूर्ती येऊन राहिली होती. विश्वंभर वास्तव्य करीत होता.

अशा या दधीचीकडे देवांसह इंद्र यावयास निघाला. सारे देव पायी येत होते. महात्म्याच्या दर्शनासाठी अनवाणी बद्धाञ्जली असे ते

येत होते. देवांच्या संगे मानवांचेही काही प्रतिनिधी होते. आपल्या तपःसामर्थ्याने जे अद्याप जिवंत होते, असे अत्री व वामदेव, वसिष्ठ व विश्वामित्र, अगस्ती व गौतम हेही निघाले.

दधीचीच्या तपोवनात मंडळी शिरली. सर्वत्र पावन व मंगल असे वाटले. सर्वत्र सुगंध दरवळत होता. येणाऱ्या थोरांचे पाखरांनी स्वागत केले. वृक्षांनी पुष्पांचे अर्घ्य दिले. देव व मानव आदराने व भक्तीने ओथंबून हळूहळू येत होते. ध्यानस्थ बसलेल्या दधीचीस सर्वांनी प्रदक्षिणा घातली. सारे हात जोडून उभे राहिले. नंतर सर्वांनी स्तव आरंभिला. दधीचींनी हळूहळू नेत्र उघडले.

देवेंद्र बोलू लागला, "हे महर्षे, हे यज्ञमृत, हे प्रेममया, ज्ञानमया, सर्व सृष्टीचा संहार होण्याची पाळी आली आहे. काही उपाय चालत नाही. आम्ही सारे कर्मच्युत झालो. भोगी व विलासी झालो. यामुळे सारी शक्ती गेली. आम्ही आज हतबल आहोत. घोर, प्रबळ शत्रू उत्पन्न झाला आहे. त्याने धेनूंसह सूर्याला पळविले आहे. सर्वत्र हाहाकार झाला. सूर्य लोपला. कर्म लोपले. अशा प्रसंगी आपणच तारू शकाल. आपल्या तपात सर्वांचे संरक्षण करण्याचे सामर्थ्य आहे. समाधी सोडा. दयेने आम्हांकडे पाहा. आपल्या चरणांना आम्ही शरण आहोत."

इंद्र थांबला. देवर्षी व महर्षी गीते गाऊ लागले. पुण्यमंत्र म्हणू लागले. दधीचींनी प्रेमाने सर्वांकडे पाहिले. घळघळ गंगा नेत्रांतून वाहिली. ती सुललित तनू पुलकित झाली. अष्टभाव दाटले. दधीची विनयाने उभे राहिले. ती पुण्यमूर्ती उभी राहिली. त्रिभुवनाचे मंगल उभे राहिले. कल्याण उभे राहिले. भाग्य उभे राहिले. दधीची बोलू लागले. वृक्षांवर पाखरे मुकी होती. पशूही झाडांखाली कान लावून ऐकत होते. साबरमतीचे पाणीही जणू वाहावयाचे थांबून ऐकू लागले. वृक्षांनी सहस्त्रावधी पर्णांचे कान केले व दधीचींचे शब्द ते प्राशू लागले.

दधीची म्हणाले, "देवश्रष्ठा सुरेंद्रा, हे सर्व देवांनो, हे थोर ऋषिमुनींनो, आपण आज मला कृतार्थ केलेत. आपले दर्शन देऊन मला पावन

केलेत. तुमच्या पुण्यमूर्ती पाहून मी धन्य झालो. मी आपला सेवक आहे, नम्र सेवक आहे. योग्य सेवा करता यावी म्हणूनच माझे जीवन मी निर्मळ करीत होतो. हे माझे निर्मळ जीवन घ्या व उपयोगी लावा. तुम्ही ज्या अर्थी माझ्या जीवनापासून सेवा घेणे इच्छित आहात, त्या अर्थी माझे जीवन निष्पाप झाले असावे असे मला वाटते. घ्या हे जीवन. या जीवनाचा मी स्वामी नाही. माझ्या जीवनाचा घडा शुद्धतेने भरलेला असेल तर तो घ्या व तुमच्या सेवेत रिता करा. देवेंद्रा, काय करू मी? कोणती सेवा?''

असे बोलून दधीचींनी सर्वांस सप्रेम लोटांगण घातले. इंद्रवरुणांनी, वसिष्ठवामदेवांनी दधीचीस उठविले. सर्वांची हृदये भरून आली होती. थोरांचे थोर शब्द. ते दगडांना पाझर फोडतात, त्यांना नवनीताप्रमाणे मऊ करतात.

इंद्र म्हणाला, ''भगवन, आपला देह मागावयास मी आलो आहे. मी अगतिक आहे. त्रिभुवनाच्या रक्षणासाठी हे कठोर दान मी मागत आहे. आपल्या प्राणांची भिक्षा घाला. आपल्या या सुपूत, सुसंस्कृत देहाची भिक्षा घाला. तपश्चर्येने पावन झालेला हा देह! या देहातील अणुरेणू अपार सामर्थ्याने भरलेला आहे. आजपर्यंत आपण यज्ञ करीत आलात. विषयवासनांचे, कामनांचे, इंद्रियांचे बाह्यरसांचे, आसक्तीचे हवन केलेत. उत्तरोत्तर यज्ञ करून पावित्र्य संपादलेत. पावित्र्य म्हणजे चिरयज्ञ. घाण जाळणे. तुमच्या जीवनातील सारा खळमळ जळून गेला. आता शेवटचा महान यज्ञ करा. पवित्र जीवनाची आहुती द्या. तुमचा देह आम्हास द्या.''

दधीचींच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. ते म्हणाले, ''देवेन्द्रा, तू कठोर नाहीस. तू अत्यंत उदार आहेस. माझ्या या मातीचे तू सोने करीत आहेस. हा देह जगत्सेवेसाठी देता येत आहे, याहून धन्यतम, प्रियतम ते काय? आज जीवन कृतार्थ झाले. तपश्चर्या सुफल झाली. वैराग्य कृतकृत्य झाले. यज्ञदेव प्रसन्न झाला. हा देह शक्य तितका शुद्ध आहे. माझे जीवन शक्य तितके निर्मळ मी केले आहे. अजूनही

दोष असतील ते तुम्हा थोरांच्या आशीर्वादाने खाक होवोत. निर्दोष एक परमेश्वर आहे. तुम्ही सारे संत मजजवळ ही माझी माती मागत आहात. मी आनंदाने देतो. माझ्या मातीचे सोने झाले. देवेन्द्रा, तुम्ही कठोर नसून कारुण्यसिंधू आहात. तुम्ही प्राण मागत नसून प्राणदान करीत आहात. मरण देत नसून अमर करीत आहात. मूठभर माती व ही हाडे नेऊन मला परमात्मा अर्पित आहात. कवडी घेऊन त्रिभुवनाची संपत्ती देत आहात. ज्या तुमच्या नंदनवनात इच्छिलेले देणारे कल्पवृक्ष असतात, सकल कामना पुरवणाऱ्या कामधेनू असतात, ते तुम्ही कठोर कसे व्हाल? तुम्ही उदारांचे राणे आहात.

ईश्वराला मी सदैव एक प्रार्थना करीत असे. त्याला म्हणत असे, 'देवा, माझे असत्य घे व मला तुझे सत्य दे. माझा अंधार घे व तुझा प्रकाश मला दे. माझे मर्त्य शरीर घे व तुझे अमृतत्व मला दे.' ती प्रार्थना परमेश्वराने आज ऐकली असे दिसते. आज माझे नवस पुरले. तळमळ शांत झाली. देवेन्द्रा, किती तुमचे आभार मानू, उपकार मानू? कसा होऊ तुमचा उतराई? हे जीवनाचे फूल मी तुम्हाला दिल्यावर आणखी द्यावयास मजजवळ काय आहे? आता मी समाधिस्थ होतो. माझी ज्योती परंज्योतीत मिळवितो. हा जीवनाचा बुडबुडा चैतन्यसिंधूत मिसळून देतो. माझी लहानशी तान त्या गानसागरात मिळवतो. आधी मी स्नान करून येतो."

असे म्हणून दधीची निघाले. स्नानार्थ निघाले. पाठोपाठ देव होते. इतक्यात वसिष्ठांना एक गोष्ठ आठवली. दधीचींची थोर पत्नी, त्यांची मुले, यांची वसिष्ठांस आठवण झाली. ते वाऱ्याला म्हणाले, "वायुदेवा, धावत जा. दधीचीच्या घरी जा. त्यांची थोर पत्नी व मुले यांना घेऊन ये. शेवटचे दर्शन त्यांना घेऊ दे. शेवटची पूर्णाहुती त्यांना पाहू दे."

वायुदेव धावत गेला. दधीचीची पत्नी पतीच्या प्रेमामुळे जिवंत होती. तिचे त्यागमय जीवन मुलांना ऊब देत होते. वायुदेव दारात उभे राहिले.

"कोण आहात आपण? देव दिसता." पत्नी प्रणाम करून म्हणाली.

"मी वायुदेव आहे."

"सूर्यदेव कोठे आहे?"

"कोणा शत्रूने पळविला."

"मग जगाचे कसे होईल?"

"कोणी महात्मा भेटला तर तो हे संकट टाळील. ज्याच्या जीवनात महान यज्ञतत्त्व ओतप्रोत भरलेले आहे. तोच तारील. त्या शत्रूवर इतर शस्त्रे चालत नाहीत."

"मग कोण आहे असा महात्मा?"

"आपला पती. त्यांच्याजवळ आम्ही प्राणभिक्षा मागितली आहे. त्यांचा देह आम्हाला पाहिजे आहे. त्यांचे प्रेममय हृदय पाहिजे आहे. हृदयाभोवतीच्या अस्थी घेऊन मध्ये हृदय बसवून त्याचे वज्र करणार आहोत. चराचरावर प्रेम करणाऱ्या महात्म्याचे ते हृदय. त्या हृदयाचे ते वज्र शत्रूला विरघळवील. ते प्रेमवज्र शत्रूला जिंकील. दधीची भगवान लवकरच देह सोडतील. तुम्हाला मी नेण्यासाठी आलो आहे. शेवटचे दर्शन घ्या. आम्हा सर्वांना क्षमा करा. तुमच्या सौभाग्याचे दान आम्ही मागत आहोत. पतिव्रते, कृपा कर. जगाचे कल्याण होऊ दे."

"माझा पती मरत नसून अमर होत आहे. अखंड सौभाग्य मला मिळत आहे. चला, मी येते. मुलांना घेऊन येते. शेवटचे दर्शन घेईन, प्रणाम करीन. मुले पायांवर पडतील, कृतार्थ होतील." असे म्हणून पत्नी यायला निघाली. सारी मुले बरोबर निघाली. वायुदेव एका क्षणात त्यांना घेऊन आला.

"शिवोऽहं धन्योऽहं परमकृतकृत्योऽहमधुना।"

असे भावनाकंप ओठांनी म्हणत दधीची साबरमतीचे स्नान करते झाले. त्यांनी साबरमतीस, त्या आपोमातेस, लोकमातेस हात जोडले. ते म्हणाले, "आई, तुझ्या पाण्याने तू मला अपहतमात्मा केलेस. तुझ्या पुण्यजलामुळे माझे जीवन निष्पाप झाले. 'इदमापः प्रवहत यत्किंच दुरितं मयि' ही माझी प्रार्थना तुझ्या पाण्याने ऐकली. तुझ्या

पाण्याने माझे पाप धुतले गेले. वासनांनी बरबटलेल्या या बाळाला, हे माते, तू शत तरंगांनी प्रत्यही धुतलेस. म्हणून हे जीवन आज जगाच्या सेवेला देता येत आहे.''

दधीची आश्रमाकडे आले. त्यांनी आश्रमाभोवतालची झाडेमाडे, पशुपक्षी यांना प्रेमाने प्रणाम केला. ते म्हणाले, ''हे माझे सखेसोयरे. माझे येथील आधार. यांनी मला रिझविले. वातावरण प्रसन्न ठेवले. हे तरू तर माझे सद्गुरू!''

दधीची झाडामाडांस प्रणाम करीत होते; परंतु हे कोण त्यांच्या चरणावर डोके ठेवीत आहे?

''हे कोण? तू का आलीस? तुझ्याच पाया पडू दे. तू अनुज्ञा दिलीस म्हणून तुझ्या पतीला हे भाग्य मिळत आहे. तू रडली नाहीस, मला अडवले नाहीस, तुझे थोर उपकार! तू थोर आहेस. जगाला माझा यज्ञ दिसत आहे; परंतु तुझा होम मला दिसत आहे.'' पत्नीला ते म्हणाले.

तिने मुलांना पायांवर घातले. दधीचींनी मुलांच्या मस्तकावर मंगल हात ठेवला. ''सुकृती व्हा!'' असा आशीर्वाद दिला.

माता व मुले दूर उभी राहिली. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते. त्यांनी हात जोडले होते. देवांनी हात जोडले. ऋषिमुनींनी हात जोडले. दधीची आसनावर बसले. सारी सृष्टी स्थिर गंभीर होती. महान यज्ञ सुरू झाला. दधीचींनी समाधी लाविली. पाखरे रडू लागली. हरणे अश्रू ढाळू लागली. सिंह हुंदके देऊ लागला. ऋषी व देव त्या महान यज्ञदेवाला प्रदक्षिणा घालू लागले. पशुपक्षी प्रदक्षिणा घालू लागले. ती माता व तिची लेकरे दुरून बघत होती. दधीचींची प्राणज्योत परमज्योतीत मिळून गेली.

''चला, बाळांनो!'' माता मुलांस म्हणाली.

''आई, बाबा कधी भेटतील, कधी उठतील?''

''ते नेहमी भेटतील. ते आपल्याजवळ आहेत, सर्वांजवळ आहेत. चला.'' ती सद्गदित होऊन म्हणाली. वायुदेवाने त्यांना घरी पोचविले.

इकडे तो पवित्र देह आसनावर होता. देहातील अस्थी दिसत होत्या. त्या अस्थींवर जणू झिरझिरीत, लखलखीत, रुपेरी असा त्वचेचा पडदा होता. ती त्वचा कोणी काढायची? अस्थी कोणी काढायच्या? कोणी करायचे ते काम? हलक्या हाताने कोण सोलणार तो देह? आईशिवाय कोण करील हे काम? हलक्या हाताने मुलाचा अंगरखा ती काढते. वसिष्ठऋषी म्हणाले, "गोमातांना हे काम सांगावे. या देहाला आपण थोडे मीठ चोळू, म्हणजे शरीराला पाझर सुटेल. गोमाता हे अंग मग चाटतील. हळूहळू प्रेमाने चाटतील. त्वचा झिरपून जाईल. अस्थी जशाच्या तशा मिळतील."

वसिष्ठांच्या म्हणण्यास अश्विनीदेवांनीही संमती दिली. अश्विनीदेवांनीच मीठ चोळावे असे ठरले. त्यांनी हलक्या हातांनी त्या पुण्यमय देहाला मीठ चोपडले. नंदिनी आदी कामधेनू आल्या व त्यांनी तो झिरपणारा देह चाटला. वरचे झिरझिरीत तनुपटल दूर झाले. आतील स्वच्छ अस्थी मिळाल्या.

इंद्राने त्या पवित्र अस्थी त्वष्ट्याच्या स्वाधीन केल्या. त्वष्ट्याने त्या अस्थींच्या मध्ये हृदय बसवून एक वज्रदेह तयार केला. ते अभंग वज्र देवेन्द्राने हातात घेतले. साऱ्या त्रिभुवनाची शक्ती हातात आल्याप्रमाणे त्याला वाटले. देवांना आनंद झाला. मानव आशेने अंथरुणात आनंदले.

वृत्राला त्या महान यज्ञाची वार्ता कळली होती. दधीचींच्या जीवनार्पणाची वार्ता कळली होती. त्याला आनंदच होत होता. ईश्वराने ज्या कार्यासाठी पाठविले ते आता पुरे होणार व जगात यज्ञतत्त्व जिवंत आहे हे कळून ईश्वराला आनंद होणार, असे मनात येऊन वृत्र नाचू लागला. त्याला स्वतःचे मरण दिसत होते; परंतु त्या मरणाबरोबरच कर्तव्यपूर्ती होणार होती. जगाच्या रंगभूमीवरील त्याची भूमिका समाप्त होणार होती. मग मरणाचे काय दुःख?

दधीचींच्या पुण्यमय देहातील अस्थींचे ते वज्र आपणांवर फेकले जाणार, या कल्पनेने वृत्र सुखावला होता. येऊ दे ते पवित्र वज्र. प्रेममय वज्र. ते मी माझ्या हृदयावर घेईन. माझ्या प्राणपुष्पांनी त्याची

पूजा करीन. ते वज्र घेताच त्याच्यासमोर मी विलीन होईन. ईश्वरात मिळून जाईन.

इंद्र व वृत्र यांचे पुन्हा युद्ध सुरू झाले. इंद्राने वृत्राला आव्हान केले व तो म्हणाला, "वृत्रा, असुरा, अधमा, आता तुझी धडगत नाही. तुला आता कोण वाचवणार, कोण सांभाळणार? त्रिभुवनाला जो गांजतो, त्याला कोण आश्रय देणार? सर्वांना छळणाऱ्या पाप्याला शेवटी आधार नाही, आश्रय नाही. स्वतःच्या पापाने तू मर. तयार हो, इष्ट देवतेचे स्मरण कर. आपल्या आईबापांचे स्मरण कर. हे पहा वज्र आले, पवित्र अस्थींचे तेजस्वी वज्र, सावध रहा."

वृत्र म्हणाला, "देवेन्द्रा, मी याच क्षणाची वाट पाहत होतो. त्या थोर महात्म्याच्या अस्थींच्या स्पर्शाने मला मरण यावे, याहून भाग्य ते कोणते? हा साक्षात परमेश्वराचा स्पर्श आहे. मला मरण नाही येणार, मी विलीन होईन. मी स्वीकारलेली कठोरता वितळून जाईल. येऊ दे ते वज्र, येऊ दे त्या महापुरुषाचे महान हृदय. त्या हृदयकमलाचा स्पर्श होताच माझे हृदय उघडेल. मी माझ्या प्राणांनी त्या पवित्र हृदयाची पूजा करीन. त्या पवित्र हृदयाचा स्पर्श व्हावा, म्हणून मी किती दिवस अधीर झालेलो आहे. माझ्या हृदयकपाटात कोंडून ठेवलेल्या त्या तेजःप्रसवा धेनू त्याही बाहेर यावयास अधीर आहेत. माझ्या हृदयाजवळ मी त्यांना ठेवले होते. आता माझे हृदय उघडेल व त्या धेनू बाहेर येतील. चराचराला पुन्हा तेजःस्नान घालतील, तेजःपान घडवतील. त्या गाई व तो गोपाळ सुखरूप आहेत माझ्या हृदयदुर्गात. फेक ते वज्र, सोड ते वज्र. या असुराच्या देहाला मोक्ष दे. मी उद्धरून जाईन.

मी असुर आहे, मी पापी आहे; परंतु प्रभूच्या आज्ञेने मला पापी व्हावे लागले. तुम्हा सर्वांची परीक्षा घ्यावयास परमेश्वराने मला पाठविले होते. तुमच्यात यज्ञधर्म जिवंत आहे की नाही, ते पाहावयास प्रभूच्या आज्ञेने मी आलो होतो. तुमची कसोटी पाहण्यासाठी मला सारे करावे लागले. तुम्ही मला शिव्याशाप दिलेत, दुष्ट, पापी, अधम, चांडाळ म्हटलेत. माझ्या नावाने सर्वांनी बोटे मोडली, खडे फोडले; परंतु हे

सारे मला सहन करावे लागले. कर्तव्य कठोर आहे. ईश्वराने सांगितले ते केले. ते जगाला रुचो वा न रुचो; स्वतःलाही रुचो वा न रुचो, त्याची इच्छा प्रमाण. देवेन्द्रा, सुर-नराची परीक्षा घेण्यासाठी असुर-संभव होत असतो. मानवजातीचे, तुम्हा सर्वांचे हृदय नीट शाबूत आहे की नाही, हे ठोकठाकून आम्ही पाहावयास येत असतो. आम्ही असुर म्हणजे जगाची परीक्षा घेणारे परमेश्वराचे दूत आहोत. त्याग, प्रेम, बंधुभाव, यज्ञ वगैरे महान तत्त्वे जगात जिवंत आहेत की नाहीत, हे पाहावयासाठी प्रभू आम्हास पाठवीत असतो. असुर हेही प्रभूचा आदेश पार पाडणारे असतात, हे ध्यानात धरा. असुरांचा तिटकारा नका करू. ईश्वराच्या नाटकात आम्हाला जी भूमिका मिळते, ती आम्ही पार पडतो. असुर होण्याची भूमिका कोणी तरी पार पाडलीच पाहिजे. खरे ना? असो. देवेन्द्रा, हा घे माझा शेवटचा प्रणाम. ही सकल चराचराला अंतिम वंदना. आता येऊ दे ते वज्र, प्रेममय हृदय. मी करांजली जोडून उभा आहे.''

तो असुर वृत्र हात जोडून साश्रू असा उभा होता. इन्द्राने ते अस्थिमय वज्र सोडले. ते निर्मळ हृदयपुष्प येऊ लागले. चराचरात परिमल भरला; गोड सुगंध दशदिशांत दरवळला. मंगल वारे वाहू लागले. जी छाती इंद्राच्या वज्रासमोर निष्कंप राहिली होती, त्या छातीला स्पर्श करून विदीर्ण करण्यासाठी ते हृदयवज्र येत होते. ती मूर्त तपस्या येत होती, मूर्त महान यज्ञ येत होता. त्रिभुवनातील पावित्र्य व मांगल्य येत होते, भेदातीत प्रेम येत होते. वृत्र भावनांनी उचंबळत होता. ते हृदयवज्र आले. वृत्राच्या हृदयाला स्पर्श करते झाले. ती पहाडी छाती दुभंगली, बंद हृदय उघडले, कठोर हृदय विरघळले, कठोर जीवन वितळले. वृत्राचा देह पडला. त्याचा आत्मा परमात्म्यात मिळाला.

वृत्राच्या हृदयकपाटात कोंडलेल्या सहस्त्रावधी तेजःप्रसवा धेनू धावतच बाहेर आल्या. किरीटधारी भगवान सूर्यनारायण गाईपाठोपाठ उभा होता. बुभुक्षित जगाला त्या गाईंनी लक्षावधी तेजःपयाच्या धारा सोडल्या. जगाला टवटवी आली. झाडे हिरवी दिसू लागली. पाखरांचे



फिकट रंग तजेलदार झाले. फुले हसली. मुलेमुली, नारीनर अंगणात नाचू लागली. "जय सूर्यनारायणा!" असे म्हणून नमस्कार करती झाली. ऋषींनी छाट्या फडकविल्या. बायकांनी फुले फेकली. मुलांनी टाळ्या वाजविल्या. चराचराला आनंद झाला. देवांनी दुंदुभी वाजविल्या. गंधर्व गाऊ लागले. अप्सरा नृत्य करू लागल्या. सृष्टीत आनंद भरून राहिला. विश्वयंत्र पुन्हा सुरळीत सुरू झाले. परमेश्वराचा सर्व त्रिभुवनाने स्तव आरंभिला. भूतलावर सारी मानवजात उभी होती, हात जोडून उभी होती. स्वर्गात तेहेतीस कोटी देव उभे होते. 'हे सृष्टिनियंत्या परमेश्वरा, विश्वरूपा, विश्वेश्वरा, आम्हाला अतःपर सद्बुद्धी दे. आमच्यात त्यागबुद्धी जिवंत ठेव, यज्ञपूजा जिवंत ठेव. दधीची भगवानांचे हे महान बलिदान, त्याची आम्हास सदैव स्मृती राहो!'

परमेश्वराचे हृदय आनंदाने व वात्सल्याने ओसंडून गेले होते.

आपल्या दिव्य ज्ञानमय सिंहासनावरून तो म्हणाला, "मुलांनो! हा पहा बाळ दधीची माझ्या मांडीवर बसला आहे. त्याने यज्ञमय असे थोर पूजन केले आहे. स्वतःचे जीवन निर्मळ करून शेवटी जगत्सेवेस त्याने दिले आहे. त्याने तुम्हाला वाचविले. एका महात्माही सकल विश्वाला वाचवितो. धन्य आहे दधीची! त्याचे दिव्य जीवन डोळ्यांसमोर ठेवा. आता उतू नका, मातू नका.

'यज्ञ एव महान् धर्मः ।
यज्ञ एव परा गतिः ॥"

हे सूत्र ध्यानात धरा. हा दधीचीचा महिमा तुम्हाला सदैव जागृती देईल. त्याच्या पुण्याईने मधूनमधून महात्मे तुमच्यात उत्पन्न होतील. ज्या स्थानी दधीचीने तप केले, आपले जीवन शुद्ध केले, आणि शेवटची पूर्णाहुती दिली ते स्थान अतिपवित्र आहे. तेथील अणुरेणू पवित्र आहेत. तेथील भूमी यज्ञमय आहे. पुनःपुन्हा मुमुक्षू तेथे जातील, आपली जीवने निर्मळ करतील. जगाच्या कल्याणार्थ होमितील. दधीची ध्यानात धरा, संयमी व्हा, कर्तव्यकर्मे नीट पार पाडा. जा आता. तुमचे कल्याण असो!"

चराचराने प्रभूला वंदन केले. दधीचीच्या आश्रमस्थानावर कल्पवृक्षाच्या फुलांची वृष्टी झाली. सुरनर आपापल्या जागी गेले, स्वकर्माने सारे रंगून गेले.

दधीचींच्या त्या महान जीवन-यज्ञाला शेकडो वर्षे झाली. साबरमतीच्या तीरावर दुधेश्वर म्हणून शंकराचे स्थान आहे, तीच काय ती त्या प्राचीन बलिदानाची स्मृती. परंतु या विसाव्या शतकात पुन्हा एक महात्मा तेथे आश्रम काढता झाला. जगातून यज्ञधर्म लोपला आहे. आसुरी वृत्ती बळावल्या आहेत. श्रमणारे मरत आहेत. श्रीमंतांची गंमत चालली आहे. स्पर्धेला ऊत आला आहे. जीवन म्हणजे काही सुखाची बेरीज, असेच समीकरण होऊ पाहत आहे. संयमाची आज टिंगल होत आहे. वासनांना ऊत आला आहे. जगात 'बळी तो कान पिळी' हे तत्त्व रूढ होत आहे. माणसे पशू होत आहेत. त्यांना पशू केले जात आहे. राष्ट्रे एकमेकांच्या अंगावर धावत आहेत. खरी

संस्कृती लोपली आहे. मानव्य मेले आहे. सद्विचार अस्तास गेला आहे. भूतमात्राचे कल्याण पाहण्याची वृत्ती नष्ट झाली आहे. जिकडे तिकडे भेद, मत्सर, द्वेष, कलह, युद्धे. जगात पाहाल तिकडे वणवे पेटले आहेत. हृदयात वणवे, बाहेर वणवे. युरोपातील राष्ट्रे मारणमरणात रंगली आहेत. काही महत्त्वाकांक्षी असुरांच्या महत्त्वाकांक्षेसाठी मानवांची कत्तल होत आहे. इकडे जपान तेच करीत आहे. दुसऱ्याला लुटणे, गुलाम करणे हाच परमधर्म होऊन बसला आहे. मनुष्यरूपाने जो जास्तीत जास्त क्रूर असा पशू होऊ बघेल, त्याची पूजा होऊ लागली आहे.

जगात आसुरी सत्ता पसरत आहेत. माणसांची मडकी केली जात आहेत. ना त्यांना जणू स्वतंत्र मन, स्वतंत्र बुद्धी. एकाचे सारे गुलाम. आणि या भरतभूमीत काय आहे? ज्या भारताने येणाऱ्या सर्वांस आधार दिला, सारे धर्म, साऱ्या संस्कृती, यांना जवळ घेऊन पोसले त्या भारतात काय आहे प्रकार?

या भारतातही आज द्वेषाची उपनिषदे, द्वेषाची कुराणे पढविली जात आहेत. हिंदुस्थान केवळ हिंदूंचा असे कोणी म्हणत आहेत, तर या हिंदुस्थानचे तुकडे पाहून पाकस्थाने निर्मू, असे कोणी म्हणत आहे. युरोपातील लोकांनी आपले लहान लहान गट केले. सारे स्वसंरक्षणास असमर्थ झाले. उद्या हिंदुस्थानातही जर अलग अलग राष्ट्रे जन्मली, तर सारी स्वसंरक्षणास असमर्थ ठरतील. सारा भारतवर्ष एक. जे जे या भरतखंडात आहेत, येथे ज्यांची घरेदारे, येथे जे राहू इच्छितात, धनी म्हणून नाही, तर एकमेकांचे भाऊ म्हणून नांदू इच्छितात, त्या सर्वांचा हा भारतवर्ष आहे. म्हणू या की, आपण सारे एक. असतील भिन्न धर्म, भिन्न संस्कृती, भिन्न भाषा, भिन्न प्रांत; परंतु भारतीयता एक आहे. या भारतात तरी आपण भेदात अभेद पाहू या, मिळते घेऊ या. महान ऐक्यसंगीत निर्मू या.

परंतु कोण ऐकणार? द्वेषाचे फवारे उडत आहेत, गरळे ओकली जात आहेत, लहान लहान मुले जमवून त्यांच्या निर्मळ-निष्पाप मनांत विषे पेरली जात आहेत. अरेरे! भारतमाता रडत असेल. दधीची भगवान काय म्हणतील?

परंतु भारतमातेचा एक सत्पुत्र या प्रचंड विरोधांच्या वावटळीत एका बाजूस साबरमतीच्या तीरी बसला होता. स्वतःचे जीवन शुद्ध करीत होता. मधूनमधून तो बाहेर येई, स्वतःच्या जीवनाची शेवटची पूर्णाहुती द्यावी म्हणून बाहेर येई; परंतु पुन्हा थांबे. आणखी होऊ दे निर्मळ जीवन, असे जणू त्या महात्म्यास वाटे.

हिंदू-मुसलमान भांडत आहेत, करू दे प्रायोपवेशन! स्पृश्य बंधू अस्पृशांना माणुसकी देत नाहीत, करू दे प्रायोपवेशन! परकीय सरकार भारतात दुही माजवू बघते का? करू दे प्रायोपवेशन! अशा रीतीने हा महात्मा जीवनाचा यज्ञ मांडीत आहे. त्याने होमकुंड पेटवले आहे.

आणि आज १९४० साली फारच भीषण छाया जगावर पसरली आहे. युद्धाचा डोंब पेटला आहे. कोणी जगाला गुलाम करण्यासाठी लढत आहेत. कोणी जगाला स्वातंत्र्य देण्यासाठी म्हणून लढत आहेत; परंतु स्वातंत्र्यासाठी लढणारेही आपल्या पंजाखाली कोट्यवधी लोक दाबून ठेवू पाहत आहेत. सारा दंभाचा, स्वार्थाचा, अहंकाराचा पसारा! आणि या भारतवर्षातही पूर्वी कधी नव्हता इतका परस्परअविश्वास, इतका परस्परद्वेष आज पसरला आहे. द्वेष पसरविण्यातच कृतार्थता मानली जात आहे.

अशा वेळी साबरमतीच्या तीरावर जेथे दधीचींनी प्राचीन काळी जीवनार्पण केले, त्याच स्थानी बसून ज्याने आपले विशुद्ध जीवन अधिक विशुद्ध केले, असा आजचा हा महर्षी, आजचा हा महात्मा, आजच्या या भीषण काळी जीवनाची शेवटची पूर्णाहुती देण्यासाठी उभा राहत आहे. अंधारात प्रकाश यावा म्हणून जगाला खरी शांती, खरी स्वतंत्रता, खरे सुख-समाधान लाभावे म्हणून शेवटचा यज्ञ करण्यासाठी अधीर होत आहे. ह्या आजच्या नव दधीचीकडे पाहा. त्या यज्ञमूर्तीकडे बघा व आपापल्या जीवनात यज्ञपूजा सुरू करा, लहानमोठी यज्ञज्योत पेटवा. कारण यज्ञहीन राष्ट्र मरते व यज्ञपूजक राष्ट्र जगते. 'त्यागेन एव एकेन अमृतत्वमानुशः' हे श्रुतिवचन आहे.



मुलांवर साने गुरुजींची अपरंपार माया. मुलांमध्ये ते फुलत-खुलत. आपल्याजवळ जे जे काही सर्वोत्कृष्ट ते ते या मुलांसाठीच, अशी त्यांची भावना असे. त्यांचे समवयस्क, त्यांचा स्नेह लाभावा म्हणून झुरत, पण गुरुजींच्या मनाच्या पाकळ्या उमलवण्याचे सामर्थ्य त्यांच्यात नसे. 'मुले म्हणजे देव' मुले म्हणजे राष्ट्राची मोलाची ठेव' असे साने गुरुजींना वाटे. प्रभूशी आपला संबंध जोडणारा हा एक दुवा आहे. अशी त्यांची भावना होती. मुलांची बुद्धी प्रखर आणि मने कोवळी असावी यासाठी ते लिहीत. मुले हा त्यांच्या साहित्याचा वाचकवर्ग. त्या मुलांना समोर कल्पूनच ते सारे लिहीत, बोलत. वात्सल्यात ओला होऊन प्रत्येक शब्द त्यांच्या लेखणीतून उमटे. ते म्हणत,

*'करी मनोरंजन जो मुलांचे,*
*जडेल नाते प्रभुशी तयाचे.*

- यदुनाथ थत्ते